

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)



महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com



# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक-मंडळ
य. दि. पेंढरकर
श्री. के. क्षीरसागर
वा. ल. कुलकर्णी
अरविंद मंगरूळकर

संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष ३०, अंक ११९ ऑक्टोबर—नोव्हेंबर—डिसेंबर १९५६

## या अंकांत



संपादकीय पत्रव्यवहाराचा पत्ता :
१.२६ डी. फणसवाडी,
मुंबई २.

महाराष्ट्र साहित्य परिषद्,
टिळक रस्ता, सदाशिव पेठ, पुणें २.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

बदलत्या ऋतुमानांतदेखील
प्रकृति निकोप ठेवण्याची गुरुकिल्ली !

सांडू
यांचीं मुलांकरितां
अनुभवसिद्ध औषध
बाळकडू
तान्ह्या मुलांकरितां
बालामृत
मुलांचें व्हिटॅमिनयुक्त टॉनिक
बालजीवन
मुलांचें टॉनिक
कुमारी आसव नं. ३
मुलांचें लिव्हर टॉनिक
कफ विकार काढा
मुलांचे अकडीवर अप्रतिम
दत्तात्रेय कृष्ण सांडू
ब्रदर्स चेंबूर लिमिटेड
– फॅक्टरी व हेडऑफिस –
चेंबूर मुंबई ३८

• • •
केशवसुत
काव्य आणि कला
शंभर पृष्ठांची विस्तृत
विवेचक प्रस्तावना

पृष्ठें २३२
संपादक—वि. स. खांडेकर
चार रंगी मुखपृष्ठ
किंमत: तीन रुपये
प्रकाशक :—देशमुख आणि कंपनी
२२ कसबा,—पुणें २.

फक्त ३ रुपयांत
आपल्या नांवाचा तीन ओळींचा
रबर स्टॅम्प, मराठी, इंग्लिश
किंवा गुजराथी भाषेंत.....
पॅड व शाईच्या बाटलीसह
घरपोंच !
पैसे आगाऊ पाठवा.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष ३०, अंक ११९ ऑक्टोबर–नोव्हेंबर–डिसेंबर १९५६

# संपादकीय

## ' सकाळ ' दैनिकाचा रौप्य-महोत्सव

डॉ. ना. भि. परुळेकर यांनी ' सकाळ ' या मराठी दैनिकाला पुणें येथे १ जानेवारी १९३२ रोजीं सुरुवात केली. या घटनेला १ जानेवारी १९५७ रोजीं २५ वर्षे पुरीं झालीं असून ' सकाळ 'ने आपला रौप्य-महोत्सव साजरा केला आहे. हा प्रवास पूर्ण केल्याबद्दल ' सकाळ 'कार डॉ. परुळेकर यांचें मी हार्दिक अभिनन्दन करतों.

डॉ. परुळेकर हे एक कल्पक संपादक आहेत व त्यांच्या कल्पकतेला खंबीरपणाची जोड आहे, हें आता सिद्ध झालें आहे. वृत्तपत्राला संस्थेचें स्वरूप प्राप्त करून देणें ही गोष्ट वाटते तितकी सोपी नाही. दैनिक वृत्तपत्राच्या संपादकाला आपल्या टीकेच्या चौफेर माऱ्यांत प्रतिपक्षाला नामोहरम करणें हेंच आपलें एकमेव कार्य आहे असें पुष्कळ वेळां वाटूं लागतें. ही वृत्ति बळावली म्हणजे राजकीय, सामाजिक अगर सांस्कृतिक क्षेत्रांत कार्य करणाऱ्या व्यक्तींनी प्रसिद्धीसाठी आपल्या पायांशीं लोटांगण घालीत यावें अशी अहंकारी अपेक्षा त्याच्या मनांत निर्माण होते. त्यामुळे संस्था निर्माण करण्यासाठी जी लोकसंग्राहक वृत्ति लागते तिचा आढळ त्याच्यापाशी असूंच शकत नाही. पण डॉ. परुळेकरांनी वृत्तपत्रव्यवसायाला सुरुवात केली तीच कांही विशिष्ट ध्येयें व कल्पना उराशीं बाळगून. कल्पक व्यक्तीच्या कल्पनांचें पुष्कळ वेळां समाजांत कौतुक होतें पण त्याच कल्पना जर थोड्यां जगावेगळ्या, तऱ्हेवाईक, अगर लौकिक अर्थाने विक्षिप्त असल्या तर त्यांचें हसें होतें, टवाळी होते. सुरुवाती–सुरुवातीला सकाळकारांच्या मासलेवाईक मराठी भाषेपासून तों चुकीचीं भाषांतरें, विक्षिप्त शीर्षकें, तऱ्हेवाईक विचारसरणी व मजकुराची रचना करण्याची

अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आगळी पद्धति इत्यादि गोष्टींपर्यन्त महाराष्ट्रांत थट्टा अगर उपहासात्मक वाच्यता झाल्याशिवाय राहिली नाही. पण या काळांत सकाळकार स्थितप्रज्ञासारखे राहिले असें आता म्हणावयास हरकत नाही. साधनांच्या शुचितेपेक्षा साध्याच्या कक्षेकडे त्यांचें विशेष लक्ष होतें; टीका होत राहिली व कित्येक वेळां इष्ट अशा सुधारणाहि सुचविणारी टीका झाली. पण डॉ. परुळेकरांच्या स्वतःच्या अशा कांही ठाम कल्पना असल्यामुळे टीकेंतील ग्राह्यांश स्वीकारून पण टीकेने डगमगून न जातां त्यांचें पाऊल सतत पुढेच पडत राहिलें. त्या टीकेला उत्तर देत ते राहिले नाहीत आणि बहुधा म्हणूनच ' सकाळ 'ला आजचें सामाजिक उपयुक्त संस्थेचें स्वरूप त्यांनी प्राप्त करून दिलें आहे. राजकीय अगर सामाजिक विचारप्रणालीवर भाष्य अगर टीका करणें एवढेंच दैनिक संपादक अगर वृत्तपत्रें यांचें कार्य नसून कांही भरीव कार्यहि त्या त्या क्षेत्रांत करतां येतें हें ' सकाळ 'ने गेल्या २५ वर्षांत सिद्ध केलें आहे.

' सकाळ 'चे वाचक व जाहिरातदार हाच ' सकाळ 'चा आधार. प्रथमपासूनच ' सकाळ 'चें धोरण अपक्ष आहे. त्यामुळे कोठल्याहि राजकीय पक्षाचा जसा त्याला पाठिंबा मिळाला नाही त्याचप्रमाणे ' सकाळ 'चें धोरण राष्ट्रीय स्वरूपाचें असल्यामुळे सुरुवातीचीं कित्येक वर्षें राज्यकर्त्यांची अवकृपा अगर रोष ' सकाळ 'ला सहन करावा लागला. अर्थात्, सरकारी अगर निमसरकारी जाहिरातींचें पाठबळ ' सकाळ 'ला मिळूं नये हें साहजिकच होतें. इतकेंच नव्हे तर, ब्रिटिश राजवटींत जामिनाच्या रूपाने कित्येक हजारांची रक्कम ' सकाळ 'ला भरावी लागलेली आहे या सर्व आपत्तींशीं झगडून ' सकाळ 'कारांनी येथपर्यन्त मजल मारली आहे ही वस्तुस्थिति भूषणावह होय.

गेल्या २५ वर्षांचा आपल्या जीवनाचा इतिहास वाचकांना निवेदन करण्याच्या हेतूने ' सकाळ 'ने रौप्य-महोत्सव खास अंक प्रसिद्ध केला आहे. या खास अंकाच्या तीन खास पुरवण्याहि प्रसिद्ध झाल्या आहेत. पुरवणी नं. १ मध्ये ' सकाळ 'ची स्वावलंबनाची कथा खुद्द संपादक ना. भि. परुळेकर यांच्या लेखणींतून उतरलेली वाचावयास मिळते. या कथेवरून संपादकांची स्वतःची पक्की भूमिका व २५ वर्षांच्या प्रवासांत त्यांच्यावर कोसळलेल्या आपत्ति व त्यांच्याशीं त्यांनी खेळलेली झुंज यांच्यासंबंधी मोठी उद्बोधक माहिती मिळूं शकते. पुरवणी नं. २ मध्ये, तरुण-तरुणींचें आरोग्य, महाराष्ट्राची औद्योगिक प्रगति, महाराष्ट्रांतील शिक्षणसंस्था, रंगभूमि, मुद्रणकला, नांव घेण्यासारखे मराठी ग्रंथ इत्यादि विविध विषयांचा गेल्या २४ वर्षांतील आढावा घेणारे लेख प्रसिद्ध करण्यांत आले आहेत. पुरवणी नं. ३ मध्ये सामान्य माणसाची असामान्य कामगिरी, महाराष्ट्रांतील प्रकाशन-व्यवसाय, विविध रोग व त्यांच्यावरील उपाययोजना, पंचवीस वर्षांतील नांव घेण्यासारखे ग्रंथ वगैरे लेख आले आहेत. असल्या आढाव्यांत अगर लेखांत मतभेदाला नेहमीच जागा असते व तशी ती यांतहि आहे. पंचवीस वर्षांतील नांव घेण्याजोगे मराठी ग्रंथ या आपल्या लेखांत प्रा. गं. भा. निरंतर यांनी 'मराठी वाङ्मयाच्या इतिहासा'संबंधी लिहितांना पुढील एक विधान केलें आहे.

" ' मराठी वाङ्मयाचा इतिहास ' हें नांव ज्याला यथार्थपणें देतां येईल असा ग्रंथ मराठींत अद्यापिहि नाही. अशा ग्रंथाची एक भव्य योजना महाराष्ट्र साहित्य परिषदेंत बरेच दिवस गर्जत होती. ती गर्जनाहि ओसरलेली दिसते. "

या विधानामुळे कित्येक वाचकांचा गैरसमज होण्याचा संभव असल्यामुळे खरी वस्तुस्थिति काय आहे हें स्पष्ट करणें आवश्यक आहे. ' मराठी वाङ्मयाच्या इतिहासाची रूपरेषा ' 'पत्रिके'च्या ११४ व्या अंकांत संपूर्णपणें प्रसिद्ध करण्यांत आलेली असून कांही खंडांचा मज-

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

कूरहि लिहून तयार झालेला आहे. प्रा. निरंतर हे परिषदेचे व निर्वाहक मंडळाचे चिटणीस असतांना गर्जना होत होत्या हें खरें आहे; पण आता गर्जना संपून मराठी वाङ्मयाच्या इतिहासाची योजना ' मार्गस्थ ' झालेली आहे एवढें सांगितलें म्हणजे गैरसमज दूर व्हावा.

असो; ' सकाळ 'कारांनी गेल्या २५ वर्षांत अनेक उपयुक्त चळवळी करून समाजाची जी सेवा केली तीबद्दल महाराष्ट्र त्यांचा ऋणी राहीलच, पण ती सेवा इतर वृत्तपत्र-संस्थांना मार्गदर्शक ठरेल अशी आशा करावयास हरकत नाही. ' सकाळ 'ला मी सुयश चिंतितों आणि पुढील काव्य-पंक्तींत प्रकट झालेल्या भावनांशीं मी सहमत होऊं इच्छितों.

मम हृदय येतसे भरभरुनी
यश तुझें वाढतें हें बघुनी !
सभोंवती निन्देची भुणभुण,
तीव्र निराशा हृदयीं साहुन
निर्धनतेचे सोसुनिया घण
तूं मार्ग काढिला त्यांमधुनी !

## उदगीरचें साहित्य-संमेलन

मराठवाडा साहित्य-परिषदेचें आठवें साहित्य-संमेलन उदगीर येथे ता. २३ व २४ डिसेंबर रोजीं मराठवाड्यांतील भक्तकवि श्री. दे. ल. महाजन यांच्या अध्यक्षतेखाली साजरें झालें. मराठवाड्यांतील लेखकांत गेलीं ८।१० वर्षे उत्साहाचें नवीन वातावरण निर्माण झालें असून नवीन वाङ्मय-निर्मिति व जुन्या वाङ्मयाचें संशोधन या दोन्ही बाबतींत तेथील लेखक-विद्वानांनी चांगलीच प्रगति केलेली आहे. साहित्यविषयक जागृति करून मराठी वाङ्मयाच्या विकासाची व प्रसाराची तेथील लेखकवर्गाची ही कामगिरी अभिनन्दनीय आहे. निजामाच्या राजवटींत मराठी भाषा, साहित्य, शिक्षण व संस्कृति यांची गळचेपी झाली; किंबहुना म्हणूनच त्यांचा विकास करण्याची तेथील विचारवन्त व कार्यकर्ते यांची इच्छा तीव्र असावी हें साहजिकच होय. आता सर्व मराठी भाषिक भाग मुंबई प्रांतांत एकसंध झाले असून मराठी भाषा व संस्कृति यांचा वर्तमानकाल व भविष्यकाल उज्ज्वल होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. याच पार्श्वभूमीवर उद्गीरचें साहित्य-संमेलन भरलेलें असल्यामुळे त्याला विशेष महत्त्व आहे.

संमेलनाचें उद्घाटन पुणें विद्यापीठांतील मराठी विभागाचे प्रमुख डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी केलें. त्यांनी दोन मुद्द्यांचा प्रामुख्याने उल्लेख केला.

( १ ) महाराष्ट्रांत मराठवाडा वेगळा, विदर्भ वेगळा, अशी फुटीर व एकांतिक वृत्ति न बाळगतां मराठी बाणा जागृत करून आशेने व उत्साहाने मराठी भाषेच्या सेवेला लागलें पाहिजे.

( २ ) मराठी भाषेचा विकास, मराठवाड्यांत अज्ञातावस्थेंत पडून असलेले शेकडो ग्रंथ, संशोधन वगैरे सर्व दृष्टींनी मराठवाड्यासाठी स्वतंत्र विद्यापीठाची आवश्यकता आहे.

### अध्यक्ष भक्तकवि महाजन यांचें भाषण

श्री. महाजन यांच्या भाषणांत मराठी भाषा व संस्कृति यांच्या विकासाबद्दल कळकळच प्रामुख्याने दिसून येते. त्यांच्या भाषणांतील कांही प्रमुख मुद्दे पुढीलप्रमाणे आहेत—

( १ ) निजामाच्या प्रतिगामी राजवटीने मराठवाड्याची आधुनिक प्रगति कुंठित करून टाकून त्याचा सर्वांगीण ऱ्हास केला आहे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

( २ ) संयुक्त महाराष्ट्राचें स्वप्न अजूनहि प्रत्यक्षांत साकार झालेलें नसल्यामुळे आपला लढा केवळ वेगळ्या दिशेने बदललेला आहे, संपला नाही. आमची भाषिक राज्याची मागणी जोंपर्यंत पूर्ण होत नाही तोंपर्यंत हा लढा संपणारहि नाही.

( ३ ) भाषेचा प्रश्न हा केवळ व्यवहाराचा नाही. भाषा हीं संस्कृतीचें आणि मनुष्याच्या आंतरिक जीवनाचें वाहन असतें. विशिष्ट समाजाचें आत्मिक जीवन त्या समाजाच्या भाषेंतील विचारसंपदेने घडविलेलें असतें. म्हणूनच एकभाषिक समाज एकत्रित बांधलेला असतो व असावा लागतो.

( ४ ) मराठवाडा विद्यापीठाची स्थापना होणें ही मराठवाड्यांतील जनतेच्या सांस्कृतिक जीवनाची नव्याने उभारणी करण्याच्या दृष्टीने अत्यंत आवश्यक अशी गोष्ट आहे. या विद्यापीठाकडूनच आद्य मराठीच्या केंद्रांतील भाषा–विशेषांचा अभ्यास व संरक्षण, जुन्या वाङ्मयाचें संकलन, संपादन व प्रकाशन व नव्या वाङ्मयाला उत्तेजन हीं कामें होऊं शकतील.

( ५ ) महाराष्ट्रांतील सर्व ठिकाणच्या साहित्य-संस्थांना समान दर्जाच्या घटक-संस्थांचा दर्जा देऊन एक मध्यवर्ती साहित्यपरिषद् निर्माण करणें आवश्यक आहे.

( ६ ) मराठवाड्याबाहेरील प्रकाशकांनी येथील साहित्यिकांना हात देणें व स्थानिक प्रकाशकांना वाव देणें हें जर सतत घडलें तरच मराठवाड्यांत प्रकाशन-व्यवसाय स्थिरावूं शकेल.

यानन्तर त्यांनी मराठवाड्यांतील लेखकांच्या लेखनसंसाराचा आढावा घेऊन आजचें ललित साहित्य व समीक्षण-वाङ्मय यांचा परामर्श घेतला आहे. हा परामर्श घेतांना त्यांनी आजचे ललित लेखक, कवि व टीकाकार यांना त्यांचीं कर्तव्यें काय आहेत हें सांगण्याचा व त्यांच्या वाङ्मयाचें मूल्यमापन करण्याचा ‘ नसता व्यापार ’ केला आहे ! तो केला नसता तर बरें झालें असतें. पण नवीन लेखन व त्याच्या पाठीमागील प्रवृत्ति यांचें नीट आकलन न होतांहि त्यावर तोंडसुख घेण्याचा मोह अनेक जुन्या लेखकांना व कवींना आवरत नाही हेंच खरें. त्यांच्या टीकेंत शास्त्रीय दृष्टिकोन तर नसतोच, पण नवीन लेखन समजून घेण्याचा प्रामाणिक प्रयत्न अगर समंजसपणाहि नसतो. जुन्या परंपरांच्या मनावरील दीर्घकालीन पगड्यामुळे त्यांची दृष्टिच दूषित झालेली असते. आपल्या मर्यादा काय आहेत याची योग्य ती जाणीव न झाल्यामुळेहि या मंडळींकडून अशी बालिश टीका होत असते. नवीन वाङ्मयाच्या उथळ ‘ समाचारा’चा हा शेवटचा भाग सोडला तर श्री. महाजन यांचें भाषण अत्यंत कळकळीचें असें झालें.

याच संमेलनाच्याबरोबर विद्यार्थि-शाखासंमेलन व महिला-शाखासंमेलन अशीं दोन शाखा-संमेलनें झालीं. विद्यार्थिशाखा-संमेलनाचे अध्यक्ष श्री. अनंतराव भालेराव यांचें लहानसेंच भाषण मोठें विनोदी, शैलीदार व विद्यार्थ्यांच्या जीवनांतील वास्तव परिस्थितीचें मार्मिक चित्रण करणारें असें झालें. एक वैशिष्ट्यपूर्ण भाषण म्हणून त्याचा उल्लेख करावासा वाटतो. ● ● ●

वा. रा. ढवळे

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

चिंतामण विनायक जोशी

# कै. दाजी नागेश आपटे

तारीख १८ डिसेंबर १९५६ या दिवशीं माझे मित्र आणि आप्त दाजी नागेश आपटे यांस बडोदें येथे विषमज्वराने आकस्मिक देवाज्ञा झाल्याचें वृत्त त्यांच्या बंधूकडून मला कळालें. ते दुखण्यांतून बरे होत आहेत असें वर्तमान नुकतेंच कळाल्यामुळे मी त्यांच्या प्रकृतीविषयी निश्चिन्त होतों. ही वार्ता वाचून मनाला धक्का पोचला. मृत्यूपूर्वी आठच दिवस त्यांचें मला पत्र आलें होतें; त्यांत त्यांनी लिहिलें होतें, "मी नव्या दिल्लीस चि. मधूकडे गेलों होतों. तेथून अनपेक्षित रीतीने परत आलों. माझ्या अर्ध-शतकाच्या सार्वजनिक दौऱ्यापैकीचा अयशस्वी झालेला हाच दौरा म्हटला पाहिजे. कारण त्यांत माझ्या प्रकृतीने मला फार मोठा खो दिला. मी गेल्यानंतर पहिले चार दिवस तेथे चांगल्या रीतीने हिंडलों, फिरलों व बऱ्याच महत्त्वाच्या माणसांच्या भेटीहि घेतल्या. पण पहिल्यापासून दिल्लीची या खेपेची थंडी मला इतकी बाधक झाली की, चार-पांच दिवसांनंतर माझें सर्व हालणें बंद पडलें व दोन्ही फुप्फुसें अशीं भरून गेलीं की, तेथील डॉक्टरांनी मला सांगितलें की आजच्या आज परत निघून बडोद्यास जा, नाही तर तुम्हांस डबल न्युमोनिया होईल. त्याप्रमाणे तावडतोब निघून मी येथे ( बडोद्यास ) आलों. डॉ. कीर्तने यांनी डबल न्युमोनियाचीच परीक्षा केली. अजून चांगला बरा होण्यास एक महिना लागेल असें त्यांचें म्हणणें आहे."

हा आशावाद निष्फळ ठरून दाजीसाहेबांस हृदय बंद पडून देवाज्ञा झाली. अलीकडे दहा वर्षे त्यांची दृष्टि बिघडल्यामुळे त्यांचें लेखन किंवा वक्तृत्व यांचा लाभ लोकांस घेतां आला नाही व आजच्या उमलत्या पिढीस नांवापलीकडे त्यांची विशेष माहिती नसली तरी सुमारें १९२० ते १९४५ पर्यंत त्यांची लेखणी आणि वाणी यांचा प्रभाव महाराष्ट्रास आणि बृहन्महाराष्ट्रास चांगलाच जाणवत होता. रसिकता, बहुश्रुतपणा, संशोधकबुद्धि आणि अघ्रपेलूपणा हे त्यांचे गुण त्यांच्या लेखनांत आणि भाषणांत तेजस्वीपणें तळपत असत.

पुणें जिल्ह्यांतील खेड ह्या गावीं व्यवसाय करणाऱ्या नागेशराव आपटे ह्या यशस्वी वकिलांचे दाजीसाहेब हे पुत्र ( जन्म १८८९ ). त्यांचें पाळण्यांतील नांव श्रीकृष्ण असून त्याचा उपयोग ते करीत नसत; टोपणनांवाचाच करीत असत. पुणें येथे हायस्कूल शिक्षण घेण्यासाठी ते राहिले असतां स्वातंत्र्यवीर सावरकर, पुढे भालाकार होणारे भोपटकर, त्याचप्रमाणे दा. वि. गोखले, लो. टिळकांचे वडील पुत्र विश्वनाथ इत्यादिकांशीं त्यांचा निकट स्नेह जमला. लहानपणीं पोवाडे रचण्याचा आणि देशाभिमानी ( त्या वेळच्या भाषेंत सांगावयाचें तर राजद्रोही ) लेख लिहिण्याचा त्यांना छंद लागला. 'काळ'कर्ते परांजपे ह्यांच्या नांवावर मोडणारा व त्यांना तुरुंगांत पाठविणारा ' नरकाचा दरबार ' हा लेख आणि सिंहगडाचा गाजलेला पोवाडा ( धन्य शिवाजी तो रणगाजी इ० ) तरुण दाजींच्या कृति आहेत अशी बऱ्याच जणांची समजूत आहे. नाशिक प्रकरणानंतर सावरकरांच्या अनुयायांच्या धरपकडीचें सत्र सुरू झालें तेव्हा फर्ग्युसन कॉलेजांतून दाजीला काढून टाकण्यांत आलें आणि त्याने विद्याभ्यास पुरा करण्यासाठीं नागपूरचा मार्ग धरला. त्या काळांत नागपूर हें मुंबई इलाख्यापासून बरेंच दूर वाटत असे. तेथे अभ्यास करून अलाहाबाद युनिव्हर्सिटीचे एल्‌एल्. बी. ते झाले;



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

परंतु पोलिसांच्या काळ्या यादींत नांव असल्याने त्यांस इंग्रजी राज्यांत सनद मिळणें अशक्य झालें.

त्या काळांत बडोद्याचे राजे हे ब्रिटिशविरोधी चळवळ्यांचें आश्रयस्थान झालेले होते. Hotbed of Sedition असें अन्वर्थक नांव त्याला व्हॅलेन्टाइन चिरोल यांनी दिलें होतें. अरविंद घोष, महंमदअल्ली, श्यामजी कृष्णवर्मा, रमेशचंद्र दत्त असले देशाभिमानी लोक सयाजीराव महाराजांनी पदरीं बाळगले होते. नाशिकच्या वादळांतून निसटलेले अनेक तरुण बडोद्याच्या किनाऱ्याच्या आश्रयाला लागले होते. दाजीसाहेब तेथेच गेले आणि एक वर्षभर तेथील दिवाण बोस ह्यांच्या सक्त नजरेखाली राहिले. शेवटीं बोसबाबू प्रसन्न झाले आणि १९१३ मध्ये दाजीसाहेबांस वरिष्ठ कोर्ट वकील म्हणून सनद मिळाली. शेवटपर्यंत ते वकिलीचा धंदा करीत असत. निर्वाहापुरता धंदा करून बाकी सगळा वेळ ते विद्याव्यासंग आणि कार्यकर्तृत्व यांत खर्च करीत. त्यांच्या व्यासंगाचे विषय अनेक होते. फलज्योतिष, गणितज्योतिष, वेदकालनिर्णय, पाश्चात्त्य तत्त्वज्ञान, प्राचीन भारताचा इतिहास अशा अनेक विषयांत त्यांची गति असून इतर विषयांचें सामान्यज्ञान आणि कलाभिरुचि यांतहि ते मागे नसत.

तरुणपणीं त्यांनी पाश्चात्त्य ग्रंथांच्या आधारें 'प्रगति आणि सुधारणा' हा ग्रंथ लिहिला. त्यांतील भाषासौष्ठव आणि विचारपद्धति यांच्यायोगे तो ग्रंथ विद्वानांच्या आदरास पात्र झाला होता. त्यांचा महत्त्वाचा दुसरा ग्रंथ म्हणजे सयाजीरावांचें त्रिखंडात्मक विस्तृत चरित्र. हें चरित्र लिहिण्यासाठी महाराजांनी आपलीं सर्व कागदपत्रें चाळण्याची परवानगी दाजीसाहेबांस दिली होती आणि कित्येक दिवस तासनुतास त्यांच्याबरोबर मनमोकळीं भाषणें त्यांनी केलीं होतीं. हा ग्रंथ म्हणजे हिंदुस्थानच्या सामाजिक आणि राजकीय घडामोडींचा सन १८९० ते १९३० पर्यंतचा इतिहास आहे म्हटल्यास चालेल. यांचा तिसरा ग्रंथ 'हिंदी सुमेरी संस्कृति' हा आकाराने फार मोठा नसला तरी अत्यंत खोल बुद्धि आणि सूक्ष्म अभ्यास यांचें फळ आहे. हा निबंध त्यांनी इंग्रजींत लिहिला असता तर नामांकित संशोधकांचें लक्ष त्याने वेधलें असतें; पण मराठींत लिहिल्याने त्याचें चीज होऊं शकलें नाही. वरील तीन महत्त्वाच्या पुस्तकांशिवाय इंद्रधनुष्य, मीराबाई, पार्लमेंट इत्यादि अनेक पुस्तकें त्यांनी लिहिलीं. महाभारतकालाविषयी दाजीसाहेबांचें विवेचन भारताचार्य वैद्य यांना इतकें पसंत पडलें की, त्यांनी तें आपल्या वैदिक वाङ्मयाच्या इतिहासास परिशिष्ट म्हणून जोडिलें आहे. शिवाजीमहाराजांच्या जन्मतिथीबद्दलच्या वादांत त्यांनी ईर्ष्येने भाग घेतला होता आणि जुनी १६२७ मधील तिथि अनेक ठिकाणीं अद्याप पाळण्यांत येते तिचें श्रेय कांही अंशीं त्यांना आहे. १९१७ नंतर साहित्य संमेलन भरलें नाही व तें पुन्हा भरण्याची शक्यता नाहीशी झाली असतां ज्या बडोदेकर तत्कालीन अधिकाऱ्यांशीं झगडून १९२१ मध्ये सर्वस्वीं प्रतिकूल स्थितींत तें थाटाने साजरें केलें त्यांत दाजीसाहेबांची प्रामुख्याने गणना आहे. विविध विषयांवरील त्यांचे लेख आणि व्याख्यानें त्यांच्या जाज्ज्वल्य विद्वत्तेची साक्ष देतात.

त्यांचें वक्तृत्व पहिल्या श्रेणीचें होतें. महाराष्ट्राबाहेर वास्तव्य असल्याने महाराष्ट्रास त्यांच्या वक्तृत्वश्रवणाचें भाग्य कमी प्रमाणांत लाभलें. त्यांची ठेंगणी, काळसर मूर्ति, चेहऱ्यावरील करारीपणा आणि विद्वत्तेचें तेज यांच्यायोगे श्रोत्यांवर छाप पाडी. संस्कृतप्रचुर अभिजात भाषाशैलीने ते आपला विषय आवेशाने प्रतिपादन करीत असत. कोट्या, श्लेष, अवतरणें आणि उल्लेख त्यांच्या व्याख्यानांत भरपूर पेरलेले असत. मराठीप्रमाणेच गुजराती, हिंदी आणि इंग्रजी भाषांत ते उत्कृष्टपणें बोलत असत आणि त्यामुळे प्रांताबाहेरसुद्धा त्यांस व्याख्यानासाठी आमंत्रणें येत.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

कार्यकर्तृत्वांत देखील त्यांचा पाय मागे नव्हता. सद्विचारिणी सभा, ब्राह्मणसभा, बडोदा एज्युकेशन सोसायटी, सयाजी साहित्यमाला इत्यादि संस्थांत त्यांनी बहुमोल कामगिरी केली. पुण्याच्या एका ज्योतिष-संमेलनाचे ते अध्यक्ष होते आणि चांगल्यापैकी ज्योतिषी होते. मात्र त्यांस सायन गणित मान्य होतें आणि फलादेश ते पाश्चात्त्य ग्रंथांच्या साहाय्याने देत असत राजदरबारीं त्यांस मान्यता असल्याने कै. श्रीसयाजीराव महाराज, श्रीमंत महाराणी चिमणाबाई, कै. संपतराव महाराज वगैरे राजकुटुंबियांची त्यांजवर प्रसन्न दृष्टि होती. तशीच स्वातंत्र्यवीर सावरकर, खासेराव जाधव, बॅरिस्टर देशपांडे, शिवरामपंत परांजपे अशा देशभक्तांचाहि त्यांच्याशीं निकट स्नेह होता. त्यांचा कुटुंबपरिवार चार पुत्र व तीन कन्या असा असून सर्व मंडळी सुस्थितींत आहेत. त्यांच्यासारखे गाढ अभ्यासी आणि विद्याभिलाषी पुरुष एकामागून एक हरपावे हें महाराष्ट्राचें दुर्दैव आहे. परमेश्वर त्यांच्या आत्म्यास शांति देवो. ● ● ●


## मनाची मुशाफरी

प्रा. म. ना. अदवंत

पृष्ठ १५० किंमत २॥ रुपये.

चार-रंगी आकर्षक मुखपृष्ठ.

प्रा. अदवंत यांचा हा दुसरा लघुनिबंध-संग्रह असून या संग्रहास लिहिलेल्या प्रस्तावनेंत श्री. वि. स. खांडेकर लिहितात, "लघुनिबंधकार अदवंत हे व्यक्तिजीवन व समाजजीवन यांचे सहानुभूतिपर टीकाकार आणि भाष्यकार आहेत. त्यांच्या निबंधांतून व्यक्त झालेले आत्मनिवेदन आणि जीवन-चिन्तन लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाची जाणीव करून देते. त्यांना मिळालेली आणखी एक देणगी म्हणजे त्यांची आशावादी मनोवृत्ति."

या व अशाच अनेक विशेषांनीं नटलेल्या त्यांच्या या लघुनिबंधसंग्रहाचें सर्वत्र स्वागत झालेलें आहे.

## पैंजण

संपादक : प्रा. म. ना. अदवंत

पृ. ३१२ किंमत ४ रुपये

शाहीर रामजोशी, अनंतफंदी, होनाजी बाळा, परशराम, प्रभाकर व सगनभाऊ या सहा पेशवेकालीन प्रमुख शाहिरांच्या कवनांचा संग्रह या पुस्तकांत केला असून, शाहिरी वाङ्मयाचें समालोचन व रसग्रहण करणारी प्रा. अदवंत यांची विस्तृत प्रस्तावना या संग्रहास जोडली आहे. त्यामुळे या वाङ्मयाचा अभ्यास करणाऱ्यांची मोठीच सोय झालेली आहे.

चित्रशाळा प्रकाशन, पुणें २.


अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद






आमचूरची
स्वादिष्ट
चटणी

जेवणाला
स्वाद व
पावाला रुचि
आणण्यासाठीं

कारखानदार
कोना प्रॉडक्ट्स.मुंबई ४

सोल डिस्ट्रिब्युटर्स
धूतपापेश्वर सेल्स कार्पोरेशन लि. मु. ४.

इंडियन कौन्सिल ऑफ ॲग्रिकल्चरल
रिसर्च, नवी दिल्ली

या संस्थेतर्फे मुंबईत भरलेल्या
अखिल भारतीय आंबा

– प्रदर्शनांत –

बक्षीस मिळालें आहे.

खगोल—शास्त्रावरील
अद्यावत् माहितीचें पुस्तक
प्रसिद्ध झालें.

ज्योतिर्वैभव

लेखक—त्र्यं. गो. ढवळे
पृष्ठें डेमीसाईजची २७७
शिवाय १५० रेखाचित्रें
आणि ११ आर्ट्प्लेट्स्.

किंमत १५ रुपये

प्रकाशक :—देशमुख आणि कंपनी
२२, कसबा, पुणें २.







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत

महाराष्ट्र
साहित्य
परिषद

कृ. पां. कुलकर्णी

# वाङ्मयांतील प्रतीकवाद

## १ वाङ्मयीन वाद

वाङ्मयाच्या समीक्षणांत निरनिराळ्या वादांचा उल्लेख येतो. त्यांपैकी कांही वाङ्मयाच्या विषयासंबंधी असतात तर कांही प्रकटीकरणाच्या पद्धतीसंबंधी असतात. कांही त्याच्या मूल्या-संबंधी असतात तर कांही त्याच्या परिणामासंबंधी असतात. त्याच्या स्वरूपांप्रमाणे त्यांचीं नांवेंहि भिन्न भिन्न असतात. वास्तववाद तर अतिवास्तववाद, आदर्श (?)वाद तर अभि-जातवाद, रमणीयवाद तर अद्‌भुतरमणीयवाद, 'अस्तित्व'-वाद तर अध्यात्मवाद, असे कितीतरी वाद वाङ्मयाच्या समीक्षणाबाबत निर्माण झाले आहेत. एखादा समीक्षक ज्या एका विशिष्ट दृष्टीने एखाद्या वाङ्मयकृतीचें—किंवा कलाकृतीचें समीक्षण करतो त्या दृष्टींतच त्या विशिष्ट वाङ्मयवादाचें मूळ असतें असें म्हणावयास हरकत नाही. हें कलाकृतीचें समीक्षण करतांना तो तिच्या विषयाकडे ज्या एका दृष्टिकोनाने पाहील तोच दृष्टिकोन त्या कलाकृतीच्या रचना-पद्धतींत प्रतीत झाला तर त्याला त्या दृष्टिकोनाचें समाधान झालेंसें वाटेल. असेंच त्याचें समाधान इतर तसल्याच कलाकृतीच्या समीक्षणांत झालें की, तो आपल्या दृष्टिकोनाला एक विशिष्ट पण अन्वर्थक असें नांव देतो हाच नंतर वाङ्मयीन ( किंवा कलाविषयक ) वाद होतो.

## २. प्रतीकवाद

खरें म्हटलें तर 'वाद' हा शब्द येथे अन्वर्थक तर नाहीच परंतु समर्पकहि पण नाही. वाद शब्द 'मत' ह्या अर्थी वापरला आहे. वि-वाद ह्या अर्थी नाही. असें असून सुद्धा 'वाद' हा सरहा रूढ झाला आहे. 'मत' हा शब्द योग्य होईल परंतु त्यांत वैयक्तिकत्वाचा संबंध येतो. 'दर्शन' हाहि शब्द कधी कधी वापरतात; परंतु त्यांत अध्यात्माची छटा असते. प्राचीनकालीं मतमतांतरांचे दर्शक म्हणून वाद, मत, दर्शन, सिद्धान्त वगैरे शब्द वापरलेले आढळले तरी त्या प्रत्येकाच्या अर्थांत कांहीतरी भिन्न अर्थाची छटा आहे हें खास. त्या छटेकडे दुर्लक्ष करून एकाच अर्थाने हे शब्द वापरले जातात ही गोष्ट निराळी ! वर निर्दिष्ट केलेल्या वादांसारखाच एक वाङ्मयीन वाद आम्ही ह्या लेखांत चर्चेसाठी म्हणून मांडण्याचें योजिलें आहे. हा वाद म्हणजे प्रतीकवाद होय.

## ३. दोहोंत फरक

इतर वाङ्मयीन वाद आणि हा प्रतीकवाद ह्यांत फरक आहे. ते वाद फक्त वाङ्मयाला अनुलक्षूनच आहेत. त्यांचा भाषेशीं संबंध नसतो. ते केवळ 'वाङ्मयीन' वाद आहेत; भाषिक नाहीत. त्यांची व्याप्ति वाङ्मयापुरतीच असते. त्यांचा भाषेशीं संबंध न आल्यामुळे त्यांच्यांत एकप्रकारचें वैगुण्य राहाणें अपरिहार्य आहे. खरा वाद असा असावयास पाहिजे की, त्याचा संबंध वाङ्मयाशीं तर आलाच पाहिजे, इतकेंच नव्हे तर, वाङ्मयाचें जें एकमेव माध्यम—भाषा—त्याच्याशींहि संबंध आला पाहिजे. वाङ्मय हें जर प्रकटन तर भाषा हें त्याचें माध्यम. तेव्हा ह्या दोन्ही अंगांना अनुलक्षून जो वाद किंवा सिद्धान्त तोच खरा, तोच पूर्ण. म्हणूनच आम्ही सर्व इतर वादांना एकांगी वाद असें म्हटलें. हें वैगुण्य 'प्रतीकवादां'त नाही. हा जितका भाषेस लागू तितकाच वाङ्मयास लागू. कलाकृतीच्या मूल्यमापनांत जितका तो यशस्वी व प्रभावी तितकाच तो कलेच्या माध्यमाच्या मूल्यमापनांत यशस्वी व प्रभावी. माध्यमाचें मूल्य-मापन व कलाकृतीचें मूल्यमापन हीं दोन परस्परांचीं पूरक आहेत; किंवा दुसरें ही पहिल्याची



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

पुरवणी आहे. कलानंदाचीं हीं दोन टोकें आहेत; एक आहे आरंभाचें व दुसरें आहे शेवटचें. दोहोंशिवाय कलानंदाची पूर्णता नाही.

**४. प्रतीकवादाचें स्वरूप**

असा हा संपूर्ण कलानंदाची प्राप्ति करून देणारा प्रतीकवाद आहे तरी काय व त्याचा संबंध कलेच्या माध्यमाशीं व प्रत्यक्ष कलाकृतीशीं येतो तरी कसा हें आता आपण पाहूं. हें पाहतांना अर्थातच वाङ्मयकलेला प्राधान्याने अनुलक्षूनच आपणांस विचार करावा लागेल. तिच्याच माध्यमाचा व त्या माध्यमांतून निर्माण झालेल्या कलाकृतींचाच विचार मुख्य जरी असला तरी ह्या विवेचनांतून निघणारे सिद्धान्त जितके वाङ्मयकलेला अनुलक्षून असतील तितकेच ते दुसऱ्या गायन, नर्तन, चित्रण वगैरे सर्व सौंदर्यनिष्ठ कलांनाहि अनुलक्षून होतील. कारण सर्व सौंदर्यनिष्ठ कलांची प्रक्रिया एकच असते व त्यांपासून मिळणारा कलानंदहि एकच असतो. तेव्हा प्रतीकवादांतून निघणारे वाङ्मयकृतीच्या माध्यमासंबंधी म्हणजे भाषेसंबंधी सिद्धान्त व तसेच त्या माध्यमाच्या परिणत अवस्थेसंबंधी म्हणजे वाङ्मयीन कलाकृतीसंबंधी सिद्धान्त इतर कलांच्या माध्यमांबाबत व कलाकृतींबाबत खरे ठरावेत हें साहजिक आहे.

प्रतीकवाद हा प्रतीकावर आधारलेला आहे. प्रतीक म्हणजे चिन्ह, लक्षण, खूण. पण चिन्ह कुणाचें ? तर मूळ वस्तूचें. मूळ वस्तूच्या अभावीं तिचें दर्शक म्हणून, तिचा प्रतिनिधि म्हणून जें चिन्ह वापरतात तें त्या वस्तूचें प्रतीक होय. खरें महत्त्व मूळ वस्तूला. पण मूळ वस्तु कित्येक वेळां प्रत्यक्ष व्यवहारांत वापरणें अशक्य होतें. अशा वेळीं त्या वस्तूच्या अभावीं आपण तिचें प्रतीक म्हणून कांही ठरवितों व त्याचा उपयोग प्रत्यक्ष व्यवहारांत करतों. 'ॐ' हें सर्व आर्यसंस्कृतीचें प्रतीक म्हणून आपण मानतों. राष्ट्राचा प्रतिनिधि म्हणून आपण त्या राष्ट्राचें निशाण मानतों. राष्ट्रासंबंधीच्या सर्व भावना त्या निशाणांत समाविष्ट केल्या जातात. राष्ट्राचें पावित्र्य, मांगल्य, प्रेम, निष्ठा वगैरे भावना त्या राष्ट्रध्वजावर एकत्रित केल्या जातात. वस्तूचे सर्व गुण, सर्व दोष, सर्व भावना व कल्पना तिच्या प्रतीकांत उतरतात. एखाद्याप्रतिनिधीस जसे मूळ पुरुषाचे सर्व हक्क प्राप्त होतात तसेंच प्रतीकाचें आहे. मूळ वस्तु व तिचें प्रतीक हीं दोन्ही भिन्न आहेत खरीं; एक दुसऱ्याचें चित्र म्हणा, किंवा छाया म्हणा किंवा खूण म्हणा, परंतु ह्या दोहोंत इतका घनिष्ठ संबंध असतो की, एकच तें दुसरें इतकें ऐक्य त्या दोहोंत निर्माण होतें. त्या दोहोंत इतका अविनाभाव आहे.

**५. त्याचें द्विविध महत्त्व**

प्रतीक हें व्यवहाराच्या व विचाराच्या प्रत्येक क्षेत्रांत वावरतें. त्याचा उपयोग केल्याशिवाय गत्यंतरच नसतें. त्याशिवाय व्यवहाराची काय किंवा विचाराची काय, पूर्णताच होत नाही. व्यवहाराच्याहि क्षेत्रापेक्षा त्याचें वैचारिक क्षेत्रांत अधिक प्राबल्य असतें. लिपिशास्त्र घ्या, आंकडेशास्त्र घ्या, धर्म घ्या किंवा राज्यव्यवहार घ्या. ह्या सर्वांत प्रतीकाचेंच प्राबल्य आहे. अ, आ हे स्वर, क्, ख् हीं व्यंजनें, १, २, ३ हे आंकडे, धार्मिक विधींतील लेपन, पूजन, भजन वगैरेंचें साहित्य हीं सर्व प्रतीकें आहेत. भाषेंतील शब्द हीं सुद्धा प्रतीकेंच आहेत. 'हत्ती' हा शब्द 'ह' आणि 'त्ती' ह्या दोन अक्षरांचें बनलेलें प्रतीक आहे. मूळ त्याची जी वस्तु—हत्ती हा प्राणी केवढा अजस्र. त्याची कल्पना जर दुसऱ्यास पूर्णपणें द्यायची झाल्यास तो अजस्र प्राणीच त्याच्यापुढे उभा करावा लागेल. परंतु हें करणें सर्व वेळेस शक्य नाही. मग त्याची कल्पना कशी द्यायची ? हत्तीचें चित्र काढून तें दाखवून त्या प्राण्याची कल्पना देतां येईल. पण हेंहि सर्व काळीं शक्य नाही. अशा आपत्तींतून सुटण्याचा मार्ग म्हणजे त्याचें कांहीतरी सहजसाध्य, सुटसुटीत असें कांहीतरी प्रतीक ठरवायचें, त्याचा वापर करून त्याला समाजाची मान्यता मिळवायची. अशा रीतीनें हत्तीचें व सर्व इतर सृष्ट वस्तूंचें



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

प्रतीक ठरवून त्याच्या साहाय्याने आपण त्यासंबंधी व्यवहार सुकर करतों. देशाचा नकाशा हें सुद्धा त्या भौगोलिक भागाचें प्रतीकच आहे. वस्तूचें प्रतीक जो शब्द तो सुद्धा त्या वस्तूचा एक प्रकारचा नकाशाच असतो. तें एक त्याचें लेबल किंवा तिकिटच होय. वस्तूचें प्रतीक जसा त्याचा शब्द तसा त्या वस्तूच्या कल्पनेचेंहि प्रतीक तोच शब्द. मनुष्य हा एक सजीव पदार्थ आहे. त्याचें प्रतीक 'म-नु-ष्य' ह्या वर्णांनी बनलेला शब्द. हा शब्द प्रत्यक्ष मनुष्य ह्या सजीव पदार्थाचा द्योतक आहे व 'मनुष्यत्व' ह्या कल्पनेचाहि द्योतक आहे. तेव्हा ह्यावरून असें ठरतें की, भाषेंतील शब्द हे वस्तूचें व त्या वस्तूसंबंधी कल्पनेचें प्रतीक असतात.

## ६. भाषेंतील प्रतीकमयत्व

भाषेंतील यच्चयावत् शब्द हीं वस्तूचीं किंवा कल्पनेचीं प्रतीकें असतात. मूळ वस्तु काय किंवा त्या वस्तूची कल्पना काय, ही त्याच्या प्रतीकाच्या अगोदरचीच आहे हें उघड आहे. ईश्वराच्या सर्जनव्यापारांतहि वस्तु ही अगोदर निर्माण झालेली असून तिचें प्रतीकीकरण किंवा नामकरण हें नंतरचेंच असणार. अगोदर वस्तु व नंतर तिच्यासंबंधी शब्द हा क्रम साहजिकच आहे. शब्द अगोदर व त्याचा अर्थ नंतर हा क्रम चुकीचा आहे. "ऋषीणाम् पुनराद्यानाम् वाचमर्थोऽनुधावति" हें विधान अलंकारिक आहे; केवळ अर्थवादात्मक कविकल्पना आहे. हें यथार्थ वास्तव विधान नव्हे. खरें विधान 'अर्थं वागनुधावति' असें पाहिजे. ह्यांत आणखी जरा सूक्ष्म दृष्टीने पाहिलें तर असें दिसेल की अगोदर वस्तु, नंतर तद्दर्शक कल्पना किंवा संकेत, नंतर तद्दर्शक (उच्चारित) शब्द, व ह्याच्याहीनंतर तद्दर्शक लिपिनिविष्ट लिखित शब्द, असा वास्तविक क्रम आहे. 'कापूस' हा मऊ पांढरा पदार्थ प्रथम, नंतर त्यासंबंधी कापुसत्वाची कल्पना, नंतर तद्दर्शक कंठ्य-ओष्ठ्य-ऊष्मा ह्या उच्चारांचा बनलेला उच्चार का-पू-स, व नंतर हा त्रिविध उच्चार तीन अक्षरांत लिहिलेला शब्द का-पू-स, असा त्याच्या निर्मितीचा शास्त्रीय क्रम आहे. ह्या प्रक्रियेंत आपण प्रतीकाचें पुनः प्रतीक करतों हें आपल्या ध्यानांतहि येत नाही. कापूस हा उच्चारसमूह हें त्या मऊ पांढऱ्या वस्तूचें प्रतीक, आणि तद्दर्शक लिखित शब्द कापूस हें त्या उच्चारित शब्दाचें प्रतीक अशी ही घटना आहे. उच्चारित शब्द हें वस्तूचें प्रतीक आणि लिखित शब्द हें त्या उच्चारित शब्दाचें प्रतीक असल्यामुळे ह्यांत प्रतीकाचें पुनः प्रतीक झालें आहे. लिपींतील सर्व अक्षरें हीं त्या त्या उच्चाराचीं प्रतीकेंच असतात. ह्या सर्व विवेचनावरून भाषा—मग ती उच्चारित असो वा लिखित असो—ती कशी प्रतीकमय असते हें स्पष्ट होईल.

## ७. व्याकरणाचें प्रतीकमयत्व

जी गोष्ट भाषेची तीच गोष्ट व्याकरणाची. इतकेंच नव्हे तर हें प्रतीकमयत्व व्याकरणांत अधिकच आढळून येतें. व्याकरण हें सूत्रवाङ्मय आहे. संक्षेप करण्याच्या क्रियेची सूत्रवाङ्मयांत परमावधि होते. 'हयवरट्,' 'अदेङ्गुणः', 'वृद्धिरादैच्,' 'इको यणचि,' 'राजाहस्सखिभ्यष्टच्' वगैरे सूत्रांत एकेका शब्दांत नव्हे, एकेका अक्षरांत त्याच्या स्वतःपेक्षा कितीतरी अधिक अर्थ भरलेला असतो. व्याकरणांतील जे अनुबंध आहेत तीं सर्व प्रतीकेंच आहेत. पाणिनीच्या अष्टाध्यायींत प्रतीकवाङ्मयाची पराकाष्ठा झालेली दिसते. व्याकरणिक सूत्रें काय, धर्मसूत्रें काय, श्रौतसूत्रें काय इतकेंच नव्हे तर, सर्व सूत्रवाङ्मय हें प्रतीकवादाचें एक उत्तम उदाहरण आहे. प्राचीन काळीं ऋषींनी वैदिक वाङ्मयाचा पसारा अवाढव्य झालेला पाहिला व तो आटोक्यांत ठेवणारें लिपीसारखें एखादें प्रतीकमय साधन तर उपलब्ध नाही. अशा परिस्थितींत त्या वैदिक वाङ्मयाचें संरक्षण व संक्रमण कसें करावयाचें ह्या त्यांच्या विवंचनेंतून 'सूत्र'संबंधी कल्पना त्यांना सुचली व त्यांनी तो सर्व वाङ्मयीन ठेवा सूत्रवाङ्मयांत गोवून टाकला. सूत्रवाङ्मयाची ही उपपत्ति भाषा व वाङ्मय ह्यांबाबत जशी आढळून येते तशी धर्म, गणित, भूमिति, खगोल,

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

भूगोल वगैरे शास्त्रांबाबतहि आढळून येते. हीं उपरिनिर्दिष्ट शास्त्रेंच काय परंतु जगांतील कोणत्याहि शास्त्राचा आरंभ, विकास, त्यांच्यांतील प्रगति—थोडक्यांत म्हणजे त्यासंबंधी सर्व व्यवहार हा प्रतीकांच्या द्वाराच होतो. त्यांच्याच द्वारा तो होणें शक्य आहे; इतराच्या नाही. आपणांस येथे व्याकरणांत आढळून येणारेंच फक्त प्रतीकांचें प्राबल्य विचारांत घ्यावयाचें असल्यामुळे बाकीच्या इतर शास्त्रांचा विचार अमळ दूर ठेवायचा आहे. तेव्हा व्याकरण हें भाषेचें प्रतीक व भाषा ही व्यवहाराचें प्रतीक कसें आहे हें आपण पाहिलें. ह्याबाबत व्याकरण हें लिपीसारखें आहे. लिपी हें उच्चारित भाषेचें प्रतीक आहे तसेंच व्याकरण हेंहीपण उच्चारित भाषेचें प्रतीक आहे. व्याकरणांतील कोणतीहि बाब घ्या, तुम्हांला तेथे हीच प्रतीक प्रक्रिया आढळेल. सामान्यनाम हें जातीचें प्रतीक तर विशेषनाम हें व्यक्तीचें प्रतीक. विशेषण हें गुणाचें किंवा संख्येचें प्रतीक तर क्रियापद हें क्रियेचें प्रतीक. शब्दयोगी अव्यय हें वस्तूच्या संबंधाचें, उभयान्वयी अव्यय हें परस्पर संबंधाचे, क्रियाविशेषण अव्यय हें क्रियेच्या रीतीचें अशीं हीं प्रतीकेंच आहेत. भाववाचकनाम व उद्गारवाचक अव्यय हीं तर मोठी मजेदार प्रतीकें आहेत. तीं वस्तूचीं प्रतीकें नसून कल्पनेचीं, समुच्चयित भावांचीं व भावनांचीं प्रतीकें आहेत. व्याकरण हाच मुळी सर्व प्रतीकांचा खेळ आहे. भाषा हा जसा वस्तूंच्या प्रतीकांचा खेळ, लिपी हा जसा उच्चारांच्या प्रतीकांचा खेळ, तसाच व्याकरण हा कांही विशिष्ट नियमांनी बांधलेल्या भाषिक प्रतीकांचा खेळ आहे.

## ८. अलंकार व प्रतीकें

ह्याच्या पुढची अवस्था म्हणजे वाङ्मय. हा मुद्दा कसा प्रतीकांचा खेळ आहे पाहा. साधें बोलणें हें शब्दशः 'वाङ्मय' आहे हें खरें, पण त्याला रूढार्थानें कधी वाङ्मय म्हटलें जात नाही हें तितकेंच खरें. साध्या सरळ बोलण्यांत त्याचा अर्थ न बदलतां थोडाफार बदल केला, त्यांत थोडा वांकडेपणा (वक्रोक्ति) किंवा अवास्तवपणा, किंवा अतिवास्तवपणा (अतिशयोक्ति) आणला की त्याच साध्या सरळ बोलण्यांत चमत्कृति उत्पन्न होऊन तें 'वाङ्मय' होतें. साध्या बोलण्यांत ही जी चमत्कृति उत्पन्न होते तीहि पण प्रतीकांच्या साह्यानेच होते. हाहि पण प्रतीकांचाच खेळ आहे. कसा तो पाहा. 'हें मुख सुंदर आहे,' हें सरळ बोलणें आहे. त्यांत सौंदर्याचें एक अधिक प्रतीक कमल किंवा चंद्र आणून सोडलें की तें बोलणें कसें अलंकारिक होतें पाहा. 'हें मुख कमलासारखें सुंदर आहे,' 'हें मुख कमल आहे,' 'अहो, हें कमलच आहे,' 'हें कमलच जणू,' 'हें मुख मुळी नव्हेच,' हें कमलच काय घेऊन बसलांत, 'अहो! तें उमललेलें कमलच नव्हे तर तो अष्टमीचा चंद्रच आहे,' 'त्या पाहा त्याच्या पाकळ्या कशा कोमेजल्या', 'तो चंद्र पाहा कसा ढगाळला!' वगैरे हे सर्व प्रकार त्या साध्या बोलण्यांत दुसरीं प्रतीकें आणून घातल्यामुळे चमत्कृति उत्पन्न होऊन तें साधें बोलणें 'वाङ्मय' कसें झालें हें आपण पाहिलें. कमल काय, चंद्र काय, गुलाब काय हीं सर्व अर्थात् सौंदर्याचीं किंवा दुसऱ्या एखाद्या कल्पनेचीं प्रतीकेंच आहेत. उपमा, रूपक, उत्प्रेक्षा, अपह्नुति, अनन्वय, विरोध, असंगति वगैरे अलंकार हे दुसरे-तिसरे कांही नसून कांही तरी विशिष्ट गुणाचीं, कल्पनेचीं प्रतीकेंच आहेत. दृष्टान्त, अर्थांतरन्यास वगैरे अलंकारांच्या बाबतींत आपण समुचित व पूर्ण अर्थाचीं प्रतीकें वापरतों, इतकाच ह्या दोहोंत फरक. अलंकारांच्या वापरानें तयार होणारें बोलणें हें थोड्या कमी प्रतीचें का होईना पण 'वाङ्मयच' म्हणायला हरकत नाही. अलंकारांमध्ये जे उपमान, उपमेय, सामान्य, विशेष वगैरे संबंधित घटक आहेत ते एकप्रकारें प्रतीकेंच होत. उपमानें हीं तर उघडउघड प्रतीकेंच आहेत. तीच गोष्ट सामान्य व विशेष ह्यांची. कधी सामान्य तर कधी विशेष हें प्रतीकाचेंच कार्य करतें. अलंकारमय वाङ्मय हा प्रतीकांचाच खेळ आहे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

९. रसनिर्मितीतील प्रतीकमयत्व

आता ह्या अलंकारमय वाङ्मयाच्या पुढची जी 'रसमय वाङ्मय' ही अवस्था तिच्यामध्येहि प्रतीकांचें प्राबल्य कसें दिसून येतें हें आपण पाहूं. रसमय वाङ्मय हें उच्च वाङ्मय होय. हें प्रातिभिक वाङ्मय होय. अलंकारनिर्मितीमध्ये प्रज्ञेचा भाग बराच असतो, तर रसनिर्मितीमध्ये प्रतिभेचा भाग बराच असतो. शब्दचमत्कृति काय किंवा अलंकार-चमत्कृति काय, ह्या दोन्ही गोष्टी रसचमत्कृतीहून नेहेमी कमी प्रतीच्या असतात. म्हणूनच तर शब्दनिष्ठ, अलंकारनिष्ठ हे वाङ्मयाचे प्रकार रसनिष्ठ वाङ्मयापेक्षा कमी लेखिले जातात. रसनिर्मितीमध्ये स्थायीभाव, विभाव, अनुभाव, व्यभिचारीभाव इत्यादींचा संबंध येतो. स्थायीभावांना इतर विभाव-अनुभावादींनी हलवून जागें केल्याखेरीज रस निर्माण होत नाही. तीं त्याचीं कारणें किंवा करणें—साधनेंच होत; आणि हीं करणें किंवा कारणें प्रतीकें नाहीत तर आहेत तरी काय? शृंगाररस निर्माण करावयाचा आहे. 'रति' ही भावना जागृत करावयाची आहे. तर मग ह्याला दुष्यन्त-शकुंतलेसारखे आलंबनविभाव पाहिजेत; वसंतऋतु, शारदीय चंद्रिका, कोकिलगायन, नायिकेचा हावभाव, नायकाचीं चाटुवचनें वगैरे उद्दीपन-विभाव पाहिजेत; नायिकेची लज्जा, तिर्यगवलोकन किंवा अंगुलिस्वेद, रोमांच, वैवर्ण्य, अंगथर-कांप वगैरे अनुभाव पाहिजेत; औत्सुक्य, हर्ष किंवा निर्वेद, ग्लानि, दैन्य, विषाद वगैरे व्यभि-चारी भाव पाहिजेत; इतकी ही सामग्री असल्याखेरीज शृंगाररसाची निर्मिति पात्रभूत व्यक्तींत काय किंवा तुम्हांआम्हांसारख्या सामाजिकांत काय, कोणांतहि होणें शक्य नाही. आता हा सर्व प्रतीकांचाच खेळ कसा आहे तें पाहा.

प्रत्यक्ष खुद्द दुष्यन्त-शकुंतलेच्या शृंगारभावना आपणांस ह्या विवेचनांत अभिप्रेत नाहीत हें कांही सांगायला नको. आपणांस वाङ्मयीन शृंगाररसनिर्मिति अभिप्रेत आहे हें उघड आहे. आता ह्यांत दुष्यन्त-शकुन्तला हे जे आलंबन विभाव आहेत ते मूळ दुष्यन्त-शकुन्तलेचीं प्रतीकेंच आहेत हें स्पष्ट आहे. तशीच गोष्ट उद्दीपन-विभावांची. वसंतऋतु म्हणा, किंवा कोकिलकूजन म्हणा, किंवा शारदीय चंद्रिका म्हणा ह्या कोणांतहि रतिभाव नाहीच नाही. तेव्हा हीं त्या रतिभावांच्या करणांचीं प्रतिकें नाहीत तर आहेत तरी काय ? अंगुलिस्वेद, रोमांच, अंगाची थरथर वगैरे सर्व त्या रतिभावाचीं प्रतीकेंच आहेत. तसेंच औत्सुक्य काय किंवा निर्वेद काय हींहि पण प्रतीकेंच आहेत, दुसरें काय ! ह्या सर्व प्रतीकांच्या साहाय्यानें एखादा प्रतिभावान् लेखक किंवा प्रतिभावान् नट वाचकांच्या व सामाजिकांच्या मनांतील रतिभाव जागृत करतो व शृंगाररस निर्माण करतो. जी गोष्ट शृंगाररसाच्या बाबतींत घडते तीच इतर रसांच्या बाबतींतहि घडते. एखादी मिणमिणती ज्योत हळूहळू विझून जाते व एखादा मृत्यु सूचित करते. दीपज्योत ही प्राणज्योतीचें प्रतीक नाही तर दुसरें आहे तरी काय ! एखाद्या भांड्याच्या आदळण्याचा आवाज भांडण सूचित करतो; झगडा किंवा संघर्ष सूचित करतो. तेव्हा तो आवाज त्या संघर्षाचें एक प्रतीक, चिन्ह किंवा लक्षणच असतें. ज्याप्रमाणें प्राज्ञिक वाङ्मय हा प्रतीकांचाच खेळ आहे त्याप्रमाणें प्रातिभिक, उच्च वाङ्मय हाहि पण प्रतीकाचाच खेळ आहे.

१० अभिनयकलेंत प्रतीकाचा प्रभाव

प्रातिभिक वाङ्मय ही एक सौंदर्यनिष्ठ कला आहे. जो नियम ह्या कलला लागू तोच नियम तिच्यासारख्या इतर सौंदर्यनिष्ठ कलांनाहि लागू असणार हें उघड आहे. अभिनयकला हीहि एक सौंदर्यनिष्ठ कलाच आहे. वर उल्लेखिलेल्या शृंगाररसनिर्मितीबाबत दुष्यन्त-शकुन्तला ह्या नटांच्या संबंधांत अभिनयकलेचा ओझरता उल्लेख आलाच आहे. नट हे मूळ व्यक्तींचीं प्रतीकेंच

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

असतात. मूळ व्यक्तीचे सर्व गुणदोष, स्वर, रूप, स्वभाव, व्यवहार वगैरे त्या नटांत उतरल्या-शिवाय तो त्या व्यक्तीचें यथातथ्य प्रतीक होऊं शकत नाही. मूळ वस्तु व तिचें प्रतीक ह्या दोहोंत समरूपत्वहि व समरसत्वहि असावें लागतें. अभिनयकलेंत दोहोंचें हें समरसत्व अत्यंत प्रभावी असतें व त्याचा परिणामहि विलक्षण होतो. भाऊराव कोल्हटकरांनी (भावड्या) स्त्रीचा वेश घेतला. त्यांनी स्त्रीचें प्रतीकत्व पत्करलें आणि त्यांनी प्रत्यक्ष सर्व स्त्रियांना भुरळ पाडली. ते प्रत्यक्ष स्त्रीसमाजांत बिनादिक्कत व बिनदखल वावरले व हळदकुंकू घेऊन आले असें म्हणतात. नारायणराव राजहंस (बालगंधर्व) ह्यांनीहि रंगभूमीवर स्त्रीचें प्रतीकत्व पत्करलें आणि आपल्या अभिनयकलेंतील उद्दीपन-विभावांनी एकदा रंगमंदिरांतील सामाजिकांना अशी भुरळ दिली की, त्यांतील एक राजपिंडी प्रेक्षक बेभान होऊन खुद्द रंगमंचकावर चढला देखील असें सांगतात. पूर्वीच्या दशावतारांच्या व फार्सांच्या काळांत नटांनी म्हणजे मूळ व्यक्तींच्या प्रतीकांनी अभिनयकलेच्या जोषांत भान विसरून रंगभूमीवर कांही उत्पात केल्याचींहि उदाहरणें ऐकिवांत आहेत. इतकें लांब कशाला जा? परवापरवाचीं उदाहरणें कांही कमी नाहीत. राजा-पूरकर नाटक मंडळींत श्री. शुक्र हे दामाजी, तुकाराम हीं कामें करीत. मूळ दामाजी व मूळ तुकाराम ह्यांचें प्रतीकत्व ते इतकें बेमालूम साधीत की, ते रंगभूमीवर यायचा अवकाश की, प्रेक्षक बसल्याजागीं दोन्ही हात एकत्र आणून माथा लववून आपण प्रत्यक्ष खऱ्या दामाजीला किंवा तुकारामाला वंदन करतों आहोंत ह्या भावनेने नमस्कार करतांना पाहिलेले कित्येकांच्या अद्याप स्मरणांतहि असेल. विष्णुपंत पागनिसांनी एका चित्रपटांत तुकारामाची भूमिका केली व खऱ्या तुकारामाचें प्रतीकत्व इतकें बेमालूम वठविलें की, चित्रपट पाहतांना भाविक प्रेक्ष-कांनी त्यांना वंदन केलें इतकेंच नव्हे तर, जाहिरातींतील त्यांच्या प्रतीकालाहि त्यांनी वंदन केल्याचें पुष्कळांनी पाहिलें असेल. मिस्टर मार्च ह्या नांवाचा एक इंग्रज प्रसिद्ध नट होता. तो नेहमी एका दारुड्याचें काम करी. हें खलपात्री दारुड्याचें काम तो रंगभूमीवर इतक्या बेमालूम रीतीने करी की सर्व प्रेक्षकांमध्ये आपणासंबंधी तो तीव्र द्वेषाची भावना निर्माण करीत असे. ह्याचा परिणाम असा झाला की, रंगभूमीशिवाय इतरत्र व्यवहारांत तो मिस्टर मार्च म्हणून जरी वावरला तरी लोक त्याचा द्वेष करावयास विसरत नसत. पुढे तर त्याचें लग्न होण्याचेंच थांबलें; कारण सर्व मुली तो एक कोणी तरी भयंकर माणूस आहे असें प्रामाणिकपणाने समजत. त्यांच्या ह्या ठाम समजुतीमुळे त्या बिचाऱ्याचें लग्नच कायमचें राहिलें. अभिनयकलेंत प्रतीकाचें प्राबल्य हें अशा थराला जातें.

## ११. इतर कलांतील प्रतीकमयत्व

अभिनयकला किंवा वाङ्मयकला ही जशी सौंदर्यनिष्ठ कला आहे तशा गायनकला, नर्तनकला, वास्तुकला, चित्रकला, मूर्तिकला ह्या सुद्धा सौंदर्यनिष्ठ कलाच आहेत. तिच्यांत जसा प्रतीकाचा प्रभाव दिसतो तसा ह्या कलांतहि दिसतो. गायनकलेंत सूर असतात. हे सूर मुख्य प्राथमिक सिद्ध असोत वा ते साधित असोत, ते साधे असोत वा संमिश्र असोत, ते एकटे असोत वा व्युच्चित अगर समुच्चित असोत; ते सर्व कोणत्या तरी भावनेचे अगर भावना-समुच्चयाचे सूचक असतात. म्हणजे ते त्या त्या भावनेचीं प्रतीकेंच असतात. त्याशिवाय त्या त्या स्वरसमुच्चयावर आधारलेला राग तो तो परिणाम करता ना. असें असल्याशिवाय दीप राग आळवल्यावर दीप लागते ना; शंकरा राग आळवल्यावर शंकराच्या ताण्डवाचें दृश्य पुढे उभें राहतें ना. हीच गोष्ट भैरवी, कानडा, सोनी, पटदीप, बागेश्री, मालकंस, जयजयवन्ती वगैरे रागांची. ह्या रागांतील निरनिराळे सूर, त्यांचें व्युच्चयन व समुच्चयन हीं त्या त्या भावनांचीं प्रतीकें मानिल्याशिवाय त्या त्या भावनेची निर्मिति होती ना. नर्तनकलेंत तर ही प्रतीकात्मता फारच जाणवते. प्रत्येक हालचाल, प्रत्येक पादसंचार, प्रत्येक चलनवलन—मग तें पायांचें असो



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

हातांच्या बोटांचें असो, मुद्रेचें असो किंवा नेत्रांचे असो,–तें प्रत्येक कोणत्या तरी दृश्याचें, अगर घटनेचें अगर भावनेचें सूचक असतें,–म्हणजे प्रतीकच असतें. उदयशंकर, रामगोपाळ, रुक्मिणी अरुंडेल ह्यांचे नृत्यप्रकार किंवा कथकली, भारत वगैरे नृत्यप्रकार हे तर उघडउघड प्रतीकात्मक आहेत ह्यांत कांही शंकाच नाही. पतंगनृत्य, पूजानृत्य, अभिसारिकानृत्य हीं नर्तनें प्रतीकात्मक नाहीत तर आहेत तरी काय ? चित्रकला तर आमूलाग्र प्रतीकात्मक आहे. मूळ वस्तूंतील ओंगळपणा चित्रकलेने निर्माण केलेल्या तिच्या प्रतीकांत शोभिवंतपणा ठरतो. भिकारीण ही ओंगळ दिसेल पण तिच्या 'भिकारण' प्रतीकांत सुमंगल दिसेल हा तुम्हां-आम्हां सर्वांचा अनुभव आहे. 'ओलेती' हें असेंच एक हृद्य प्रतीक आहे. मूर्तिकला तर उघड-उघड प्रतीकात्मक आहे. तीच गोष्ट थोड्याफार फरकाने वास्तुकलेचीहि आहे. ह्या कलेंतील काय किंवा इतर कलांतील काय, आकार, प्रमाणबद्धता, औचित्य, संगति वगैरे सौंदर्यनिर्मितीचे घटक आहेत हें खरें. त्यांच्या सर्वांच्या समुच्चयाने सौंदर्य निर्माण होतें हेंहि खरें; परंतु हीं सर्व सौंदर्याचीं प्रसाधनें होत; म्हणजे तीं प्रतीकें होत. तीं प्रत्यक्ष सौंदर्य नव्हत; त्यांतील प्रत्येक घटक तर 'सौंदर्य' नव्हेच नव्हे. कलानंद म्हणून जो ब्रह्मानंदापेक्षा किंचित् ऊन असा आनंद मानिला आहे त्यांत प्रतीकाचा प्रभाव किती आहे हें वरील विवेचनावरून स्पष्ट होईल.

### १२. कलानंद व प्रतीकात्मता

वाङ्मयानंद किंवा कलानंद हा प्रतीकप्रधान कसा आहे हें आपण पाहिलें. ह्यावरून वाङ्मयानंदाच्या ज्या निरनिराळ्या उपपत्ति विद्वानांनी मांडिल्या आहेत त्यांवर सुद्धा अधिक प्रकाश पडेल. कलावंत हा आपल्या कलाकृतींत आपल्या अनुभवाचा आविष्कार करतो. तो एका विशिष्ट अनुभवविश्वांत वावरतो व तो तें आपल्या कलाकृतींत प्रकट करतो. परंतु हा अनुभव कोणता ? अनुभव दोन प्रकारचा असतो; एक साक्षात्–प्रत्यक्ष अनुभव व दुसरा त्यापासून उद्भवणारा प्रतीकात्मक अनुभव. साक्षात् प्रत्यक्ष अनुभव त्याच्या कलाकृतींत कधीहि आविष्कृत होत नाही. तो जर आविष्कृत झाला तर ती कृति खरी अभिजात कलाकृतिच होणार नाही. ती एक अधम कलाकृति होईल. खऱ्या अभिजात कलाकृतींत त्या कलावंताचा प्रतीकात्मक अनुभवच आविष्कृत होत असतो. त्याची गोष्ट अशी आहे की, तो खुद्द कलाकार स्वतः प्रत्यक्ष त्या साक्षात् अनुभवविश्वांत वावरतो तर तोच कलाकार जेव्हा स्वतःचें प्रतीक बनून त्या प्रतीकात्मक अनुभवविश्वांत वावरतो तेव्हा त्याच्या हातून अभिजात कलाकृति निर्माण होते. जसें अनुभव-विश्व दोन प्रकारचें–एक साक्षात् व दुसरें प्रतीकात्मक तसा कलाकारहि दोन प्रकारचा–एक साक्षात् प्रत्यक्ष व दुसरा प्रतीकात्मक.

### १३. कलानंदाच्या उपपत्तींवर प्रकाश

ही जशी कलाकाराची गोष्ट आहे तशीच वाचकाची, सामाजिकाची किंवा कलानंदाचा आस्वाद घेणाऱ्याची गोष्ट. वाचकहि कलास्वाद घेतांना त्या त्या कलाकाराशीं म्हणा, किंवा त्या त्या कलाकृतीशीं म्हणा किंवा त्या त्या पात्राशीं म्हणा एकरूप जो होतो तो प्रतीकात्मक रीतीनेच होतो. कलाकृति निर्माण करतांना कलावंत जसा प्रतीकात्मक बनतो तसा त्या कलाकृतीचा आस्वाद घेतांना वाचकहि पण प्रतीकात्मक बनतो. म्हणून त्या दोघांची कलानंद-भोगाच्या बाबतींत एकवाक्यता होते. एरव्ही हें दोघांचें साम्यरस साधतें ना. कलानंदाची कोणतीहि उपपत्ति तुम्ही माना; तींमध्ये ही दोघांची प्रतीकात्मक देवघेव चाललेली असते. 'सविकल्प समाधींत' तर ही प्रतीकात्मता स्पष्ट आहे. सविकल्प ह्या शब्दांत वाचकाचें प्रत्यक्षत्व अभिप्रेत आहे तर समाधि ह्या शब्दांत त्याचें प्रतीकत्व अभिप्रेत आहे. 'सहानुभूति-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

पूर्वक ताटस्थ्य ' ह्यांतील ताटस्थ्य शब्दांत त्याचें प्रत्यक्षत्व आहे तर सहानुभूति शब्दांत त्याचेंच प्रतीकत्व आहे. ' स्वायत्त तादात्म्य ' ह्यांतील स्वायत्त शब्दांत त्याचें प्रत्यक्षत्व आहे तर तादात्म्य शब्दांत त्याचें प्रतीकत्व आहे. त्याच्या साह्यानेंच तो तादात्म्य पावतो. ' परकाया-प्रवेश ' ह्यांत तर प्रतीकत्व मानिल्याखेरीज गत्यंतरच नाही. नाहीतर फार घोटाळे उडतील. ' पुनःप्रत्यय ' ह्यांत वर सांगितलेल्या प्रत्यक्ष अनुभवविश्व व प्रतीकात्मक अनुभवविश्व ह्या दोहोंचा उघडउघड संबंध येतो. ' प्रत्यभिज्ञा ' सिद्धान्तांत ' आपणच तें आहोंत ' अशी जी जाणीव निर्माण होते ती त्याच्या प्रतीक होण्यानेंच होते हें अगदी स्पष्टच आहे. तेव्हां कलानंदाच्या ह्या सर्व उपपत्तींच्या मुळाशीं प्रतीकात्मता आहे. ही प्रतीकात्मता त्या कलाकृतींत आहे, तिच्या द्रव्यांत आहे, तिच्या साधनांत आहे, तिच्या क्रियारीतींत आहे, तिच्या निर्मात्यांत आहे, इतकेंच नव्हे तर, तिच्या चहात्यांतहि आहे. ह्यामुळेच कलानंद जसा निर्मात्याला मिळतो तसा रसिकालाहि मिळतो.

## १४. ब्रम्हानंद व प्रतीकात्मता

ह्या कलानंदाच्याहि पुढचा व त्याच्यापेक्षा श्रेष्ठ असा जो ब्रह्मानंद त्याच्या बाबतींत तर ही प्रतीकात्मता पदोपदीं जाणवते. कलानंदाच्या निरनिराळ्या उपपत्तींवर जसा त्याने अधिक प्रकाश पडतो तसा जीवपरब्रह्माच्या ऐक्यासंबंधीच्या द्वैत–अद्वैत–विशिष्टाद्वैत–शुद्धाद्वैत–केवलाद्वैत वगैरे ज्या उपपत्ति आहेत त्यांवरहि अधिक प्रकाश पडतो. विश्वामध्ये तीन तत्त्वें अनाद्यनन्त मानिलीं आहेत. एक परमात्मा, दुसरें जीवात्मा, तिसरें जडसृष्टि. ह्यांपैकी परमात्म्याला इच्छा झाली की आपण पुष्कळ व्हावें–स ऐच्छत बहु स्याम्–आणि तो पुष्कळ झाला. ह्यांतील भाविक भाग सोडून द्या. परमात्म्यानें आपलें प्रतीक म्हणूनच जीवात्मा निर्माण केला. परमात्म्यानें आपलें प्रतीक म्हणूनच सर्व जडसृष्टि निर्माण केली. सर्व चित् व अचित् वस्तुमात्रांत परमात्मा आहे ह्याचा अर्थच हीं त्याचीं प्रतीकें आहेत असा आहे. तो परमात्मा जसा खरा तशीं हीं त्याचीं प्रतीकेंहि पण खरींच. संसार हा जर त्या परमात्म्याचें प्रतीक आणि परमात्मा हा जर खरा, सत्य तर संसारहि सत्य ठरतो. संसार हा मिथ्या नाही; तो मायेचा पसारा नाही. जीव हाहि मिथ्या नाही; तो अविद्येचा पसारा नाही. प्रकृतीच्या नर्तनाने हा सर्व पसारा निर्माण झाला ही एक वेदान्ती उपपत्ति आहे इतकेंच. चित्, अचित् हीं सर्व त्या परमेष्ठी परमात्म्याचीं प्रतीकें आहेत. ह्यावरून मायावाद काय, परिणामवाद काय, किंवा विवर्तवाद काय सर्व फोल ठरतात. जीव व जडसृष्टि हीं परमात्म्याचीं प्रतीकें आहेत व तीं सत्य आहेत, मिथ्या नाहीत ह्या दृष्टीने द्वैतसिद्धान्त ठरतो, तर तीं परमात्म्याचीं एकाचींच भिन्न भिन्न प्रतीकेंच आहेत, त्याचेच ते प्रतिनिधि आहेत ह्या दृष्टीने अद्वैतसिद्धान्त ठरतो.

कलानंद व ब्रह्मानंद ह्या दोहोंसंबंधी प्रतीकात्मता कशी प्रभावी आहे ह्याचा विचार ओघाने आला म्हणूनच येथे तो केला व तोहि संक्षेपाने केला आहे. ह्यावर अधिक विवेचन होणें जरूर व शक्य आहे. परंतु तूर्त इतकेंच पुरें. ह्यावर कोणी असें म्हणेल की, सर्व जिकडे तिकडे आम्हांला प्रतीकात्मताच दिसते. होय; अशी गोष्ट आहे खरी. प्रतीकात्मताच जिकडे तिकडे भरून राहिली आहे. ती आपल्या जीवनव्यवहारांत इतकी भिनली आहे की, ती आपणांस समजत नाही. आपणांस तिचा पार विसर पडला, इतकी ती आपणांशीं एकरूप झाली आहे. भाषा नाही का मानवाशीं एकरूप झाली ? नाही तर अक्षरवर्ण हा स्वराचें प्रतीक, शब्द हें वस्तूचें प्रतीक, वाक्य हें विचाराचें प्रतीक, अलंकार हें गुणाचें प्रतीक, कलाकृति हें भावनांचें प्रतीक, सजीव-निर्जीव सृष्टि हें परमात्म्याचें प्रतीक हें काय सांगायला पाहिजे ? ● ● ●



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

चैतन्य देसाई

# मराठी समोच्चारित छंद

## २ अभंग

### (१) भजनी पद्य

अभंग हें भजनी पद्य असल्यामुळे तें तालासुरावर 'म्हटलें' जातें. कथाकीर्तनांत तर तें रागदारीवरहि 'गाइलें' जातें; पण अभंग हें वारकरी संप्रदायाचें खास गीत असून वारकरी परंपरेप्रमाणे तें समोच्चारित गाइलें जातें, असा अनुभव आहे. त्याप्रमाणेच त्याचें चलन खालीलप्रमाणे होईल :

#### (अ) अभंग समोच्चारित

(१) { ना हीं नि र्म ळ जी व न । का य क री ल सा ब ण ॥
जे कां रं ज ले गां ज ले । त्यां सी म्ह णे जो आ पु ले ॥

(२) { ऊं स डों गा प रि र स न व्हे डों गा । का य भु ल ला सी व र लि या अं गा ॥
जा उ नि या ती र्थां का य तु वां के लें । च र्म प्र क्षा ळ लें व री व री ॥

#### (आ) अभंग लघुगुरूप्रमाणे

(१) { ना हीं नि र्म ळ जी व न । का य क री ल सा ब ण ।
जे कां रं ज ले गां ज ले । त्यां सी म्ह णे जो आ पु ले ॥

(२) { ऊं स डों गा प रि र स न व्हे डों गा । का य भु ल ला सी व र लि या अं गा ॥
जा उ नि यां ती र्थां का य तु वां के लें । च र्म प्र क्षा ळ लें व री व री ॥

यांतील 'तीर्थां' आणि 'परि' यांच्यापुढे प्रथम चरणाची पूर्ति म्हणून चरणरेषा घालणें योग्य होईल.

### (२) त्र्यस्र व चतुरस्र अभंग

दोन व तीन आघातांचे असे निरनिराळे दोन प्रकारचे मूळ ताल पाश्चात्त्य संगीत-शास्त्र मानतें. तालाचें हेंच तत्त्व भारतीय संगीतानेंहि मानलें होतें. तीन व चार आघातांचे असे दोन प्रकारचे मूळ ताल 'त्र्यस्र' व 'चतुरस्र' या नांवाने प्राचीन भारतीय संगीत-शास्त्रकारांनी स्पष्ट उल्लेखिलेले आहेत :

चतुरस्रस्तथा त्र्यस्र इति तालो द्विधा मतः ।

(संगीत-रत्नाकर, ५-१७.)

या दोन मूळ शुद्ध तालांच्या पटीने वा मिश्रणाने बाकीचे सर्व ताल म्हणजे शास्त्रीय संगीताचे ताल बनले आहेत. आश्चर्याची गोष्ट म्हणजे याच मूळ दोन तालांत मराठीची



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी वाचणे तोषवे
महाराष्ट्र साहित्य परिषद

### ( ५ ) ओवीसमानचे अभंग

अष्टाक्षरी अभंग लघुगुरूप्रमाणे वाचले तर ते दोन-चरणी ( द्विपदी ) ओवीसारखे ( कित्येकदा अर्थातच घनाक्षरीसारखे ) दिसतील. उदा०—

जे कां रं ज ले गां ज ले । त्यां सि म्ह णे जो आ पु ले । वगैरे.

षडाक्षरी लांब अभंगामध्ये कधी कधी तीन पदकें असतात. तो लघुगुरूप्रमाणे वाचल्यास थेट ओवीच होईल. उदा०—

मालाचे पैं पेटे । वाहताती उंटें । तयांलागीं कांटे । भक्षावया ।। ( तुका० )

बोलवरी बोलती । श्रुति वाखाणिती । हरि पाविजे ती गती । वेगळी असे ।।

तुज न पवे गा तें स्वप्न । हरि शब्द एकचि ब्रह्म । पाविजे तें वर्म । वेगळें असे ।।(ना.)

हीं उदाहरणें अगदी ओवीसारखीं आहेत; पण अशा तऱ्हेचीं उदाहरणें फार थोडीं मिळतील; त्यांना ओवी पद्यवर्गांत चकत्र टाकावीं. पण त्यासाठी त्यांची ' चाल ' लावून पाहिली पाहिजे. उदा०—

कन्येचा जे नर । करिती विकरा । ते जाती अघोरा । नरकपाता ।।

हें लघुगुरुपठन ओवीप्रमाणे सुघड न वाटतां अवघड वाटतें. ओवी ही ह्रस्वदीर्घाप्रमाणे बोलण्यासाठी मुळांतच रचलेली असते, त्याप्रमाणे अभंग रचलेले नाहीत, हेंच या अवघडपणाचें कारण होय. नवनीतांत ओवीकारांचे ' वेचे ' दिले आहेत. त्या दरेक उताऱ्यांतील पहिलीच ओवी वाचली, तर तींतील लघुगुरूंची मांडणी सुघड व डौलदार प्रवाही असल्याचें आढळून येईल. उदा०—

( १ ) एकनाथः—" जो अजन्मा नित्य त्रिभुवनीं । जो न जन्मोनि जन्मला योनी । तेणें धर्माची धर्मपत्नी । केली जननी दक्षकन्या ।। "

( २ ) रामदासः—" आतां वंदूं कवीश्वर । जे शब्दसृष्टीचे ईश्वर । ना तरी हे परमेश्वर । वंदावे तरी ।। "

( ३ ) मुक्तेश्वरः—" कौरववंशीं प्रख्यात-कीर्ती । दुष्यंतनामा गुणैकमूर्ती । श्रेष्ठ भूपाळ चक्रवर्ती । वीर्यें शौर्यें आगळा ।। "

( ४ ) श्रीधरः—" ऐकोनि हरि-प्रताप उदंड । कंस चिंताक्रान्त अखंड । म्हणे कृष्णें दैत्य मारिले प्रचंड । देव समस्त भीति जया ।। "

( ५ ) महीपतिः—कृपांतोनि जालंधर । कानिफा काढीतसे सत्वर । दृष्टि पाहाती नारीनर । जैसा भास्कर उगवला ।। "

वरील उताऱ्यांतील " म्हणे कृष्णें दैत्य मारिले प्रचंड । " सारखा क्वचित् एखादा ' प्रचंड ' चरण सोडल्यास ओवीच्या बहुतेक चरणांतील लघुगुरूंची साखळी अशा तऱ्हेने सांधलेली दिसेल की, चरणाच्या गृहीत लांबीची मात्रापूर्ति ठोकळ मानाने व्हावी व पद्य-गति प्रवाही राहावी.

' कन्येचा जे नर ' सारखे अभंग समोच्चार-पद्धतीने ' म्हटल्या ' स अडखळावयास होत नाही. या पद्धतींत अक्षरागणीक तालाघात पडतो आणि त्याच कारणाने अभंगांत मात्रादि नियम वगळून फक्त अक्षरसंख्येचा नियम—क्वचित् अपवाद सोडून—कसोशीने पाळलेला असतो. थोडक्यांत म्हणजे हा अक्षरनियतीचा नियमच दाखवितो की, अभंग हें समोच्चारित पद्य आहे.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## ( ६ ) ओवी, अभंग आणि घनाक्षरी

उक्त तिन्ही पद्यांचें एकमेकांशीं कमीजास्त साम्य आहे, तसें थोडेंफार वैषम्यहि आहे. घनाक्षरीचें ओवीशीं निकट साम्य आहे, तसेंच आणि तेवढेंच तें द्वादशाक्षरी अभंगाचेंहि ओवीशीं आहे आणि अष्टाक्षरी अभंगाचें बव्हंशीं घनाक्षरीशीं आहे. या दरेक पद्याच्या शास्त्रीय स्वरूपाची विगतवारी बारकाईने पाहिल्यास त्यांचें परस्परांशीं असलेलें साम्यवैषम्य दृष्टोत्पत्तीस येईल:

### ( १ ) ओवी

( १ ) चरण चार असतात. ( क्वचित् साडेचार )
( २ ) अक्षर-संख्या नियमित नाही.
( ३ ) पहिल्या तीन चरणांना अन्त्य यमक असतें.
( ४ ) चौथा चरण दोनचार अक्षरांनी तोकडा असतो.
( ५ ) पठन-रीति ( = वाचण्याची धाटणी ) 'हरदासी' गद्याप्रमाणे जरा सुरावर किंवा गळ्यावर.
( 'एकनाथी' लांबा ओवीप्रकार साडेचारचरणी थोडया फरकाने आहे. )

### ( २ ) घनाक्षरी

( १ ) चरण चार असतात.
( २ ) अक्षरसंख्या नियमाने ८।८।८।७ अशी असते.
( ३ ) पहिल्या तीन चरणांना अन्त्य यमक असतें.
( ४ ) पहिल्या तीन चरणांतील अन्त्याक्षर लघु असतें.
( ५ ) चौथा चरण एक अक्षराने तोकडा असतो.
( ६ ) पठन-रीति वृत्तगायनाप्रमाणे ( तालासुरांत ).

### ( ३ ) अभंग

( अ ) षडाक्षरी
( १ ) ( १ ) चरण चार असतात.
( २ ) अक्षरसंख्या प्रतिचरणीं ६।६ असते.
( ३ ) पहिल्या तीन चरणांना यमक असतें.
( ४ ) चौथा चरण दोन अक्षरांनी तोकडा असतो.
( ५ ) चलन व पठनरीति 'वृत्त'-गायनाप्रमाणेच, पण सरल-ताल-बद्ध.
( २ ) ( १ ) यमकाची जुळणी दुसऱ्या व तिसऱ्या चरणालाच असते, बाकी घडण वरील ( अ १ ) प्रमाणे.

( आ ) अष्टाक्षरी
( १ ) चरण दोनच असतात.
( २ ) अक्षरसंख्या प्रतिचरणीं ८।८ असते.
( ३ ) यमक प्रतिचरणान्तीं असतें.
( ४ ) पठन-रीति उपर्युक्तप्रमाणेंच.

वरील कोष्टकांतील मुद्द्यांची तुलना केल्यास खालील विशेष प्रतीत होतातः—
( १ ) घनाक्षरी ही अक्षरसंख्याबद्ध ओवीच आहे. ( कांहीं मामुली फरक सोडून. )

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

( २ ) षडाक्षरी अभंग हाहि अक्षरनियत ( पण तालबद्ध ) ओवीप्रकारच होईल.

( ३ ) अष्टाक्षरी अभंग हा अर्धी-घनाक्षरी होईल. ( चरणांत लघूचा फरक सोडून ).

शास्त्रीय भाषेंत हीच गोष्ट अशी सांगतां येईल कीः

( १ ) ओवी ही पाद-विभक्त पद्य आहे.

( २ ) घनाक्षरी ही अक्षरनियत ओवी आहे.

व ( ३ ) अभंग ही तालबद्ध ओवी आहे.

या तुलनेंत अभंग-घनाक्षरीचा समोच्चारितपणा मुद्दामच बाजूस ठेवला आहे. पद्याचें चलन, 'गायन' व तालबद्धता यांबद्दलचें विवेचन पुढे यथावकाश करूंच. अभंग ही सरल-ताल-बद्ध रचना असली तरी ती 'पद' या वर्गात जात नाही, हेंहि तेथेंच दाखवूं.

घनाक्षरीचें ओवीशीं फारच साम्य असल्यावरून तीं ओवींतून उत्पन्न झाली असावी, असा तर्क मीं माझ्या मागच्या लेखांत दिला होता. असाच तर्क अभंगाच्या उत्पत्तीविषयीहि करतां येईल; पण अशा घटनांना निदान कालक्रमाचा तरी पुरावा पाहिजे, तो आपल्याजवळ निश्चित नाही; तथापि विकासाच्या दृष्टीने पाहिलें, तर ओवी ही सुसरल म्हणजे प्रथमची रचना वाटते, कोणी तिला प्राथमिकहि [ 'गद्यमय' 'आर्ष' ( = 'जंगली' ) ] मानतात; पण मानवी संस्कृतींत पठन-प्रवचन, भजन, लोकगीत व कवन हीं एकांतून दुसरें या प्रजापरंपरेने पैदा झालीं की हीं चारीपांची भांवडें एकाच वेळीं किंवा पाठोपाठ अवतार पावलीं, हें सांगणें कठीण आहे! तथापि त्यांची आवश्यकता मानवास एकाच वेळीं लागली असावी त्यामुळे तीं एकाच वेळीं किंवा एकामागून एक, पण स्वतंत्र रीत्याच उद्‌भूत झालीं असणें जास्त योग्य दिसतें. पैकी ग्रांथिक ओवी बहुधा लौकिक ओवींतून ( स्त्रीगीतांतून ) उत्पन्न किंवा विकसित झाल्याचा तर्क सोपा वाटतो, पण तो मान्य होण्याइतपत पुरावा त्याला मिळालेला दिसत नाही. घनाक्षरी ही संस्कृतमधून किंवा हिंदींतून मराठींत आली असल्याबद्दल पुरावा मिळतो; त्यांत घनाक्षरीच्या ऐतिहासिक अग्रक्रमाचा हातचा एक मिळवितां आला, तर अभंग व ओवी हीं घनाक्षरींतून निघालीं असें उलट म्हणतां येईल. सारांश, या तिन्ही मराठीछंदांचें परस्पर नातेंगोतें निश्चित करणें, वाटतें तेवढें सोपें नाही! अभंग व घनाक्षरी यांचा समोच्चारिताचा गुण लक्षांत घेतल्यास ओवी व अन्यवृत्तांशीं त्यांचें नातें राहत नाही.

घनाक्षरीवरील मागील लेखांत 'ताराकी ज्योतमें०' हें कवि गंगकृत हिंदी समोच्चारित पद्याचें उदाहरण दिलें होतें. ह्या पद्यास 'सवैया' छंदांत संग्रहकर्त्यांनी टाकलें आहे. त्याच्या जोडीचीं 'गंग तरंग प्रवाह चले ओर', 'सोल सिंगार सजी खुब श्यामा०' वगैरे गंगकृत पद्यें सवाई छंदाचीं स्पष्टच आहेत. रघुनाथपंडिताच्या 'नलदमयंती आख्यानांत' 'हंस धरीन म्हणोनि मनोरथ०' हें पद्य सवाई नांवाने दिलें आहे, ही हिंदी सवैयाच असून मराठींत पहिल्याने ती त्यानेच उतारलेली दिसते. त्याच आख्यानांतील त्याचें 'पद' 'रूपवती ते भूप-सुता०' हें सवैयांतील चरणान्त गुरु छाटला असतां उत्पन्न होतें; तें असो. मराठी घनाक्षरीसमान दिसणारी हिंदी घनाक्षरी हिचें कवि गोपकृत एक उदाहरण मीं मागल्या लेखांत दिलें होतें. मराठी घनाक्षरी ३१ अक्षरांनी होते, पण या हिंदी घनाक्षरींत ३१ अक्षरांचा एक चरण गणून, अशा चार सयमक चरणांनी ती संपूर्ण होते. याशिवाय हिंदीचा 'कवित' म्हणून प्रसिद्ध छंद आहे, तो चरणाक्षरसंख्येनुसार मराठी घनाक्षरीशीं बरोबर जुळणारा आहे. उदाहरणार्थः

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

( १ ) काहेको जपोगे जप । काहेको तपोगे तप ।
काहेको प्रपंच पंच–। पावकमें दहिये ॥ १ ॥
रैनदिन आठो जाम । राम-राम-राम-राम ।
सीताराम सीताराम । सीताराम कहिये ॥ २ ॥
( कवि पद्माकर )

( २ ) आया हैं कलका दोर । घर घर कांगाटोल ।
पोल पोल ठोर ठोर । पाप बेली जागी हे ॥ १ ॥
जूटेकु सच्चा करे । सच्चेकु जूठा करे ।
मायाकी लोभसें । दुनिया अत्यागी हे ॥ २ ॥
पून्य गयो पूरब प्र–। तीति गई पच्छिमको ।
*दया गई दखनको । धर्म उत्तर धायो हे ॥ ३ ॥
( 'कलिवर्णन' - कवि चौरामल )

वरीलपैकी कांही ' कवित ' मध्ये पहिल्या तीन चरणांना अन्त्य यमकें आलीं आहेत, पण अर्थातच तो नियम मानण्याचें कारण नाही. चरणाक्षरांच्या ८।८।८।७ या संख्येशिवाय मराठी घनाक्षरीचे बाकीचे नियम या ' कवित ' ला लागू नाहीत. ' कवित ' समोच्चारित नाही; तथापि त्यांतील कित्येक लघुगुरूंचा उच्चार एकसारखाच होत असतो, त्यामुळे तो समोच्चारिताच्या जवळ येतो.

हा 'कवित' छंद फार जुना असून हिंदीच्या चंदभाट, भूखन, केशव वगैरे पुराण्या कवींनी त्याचा वापर केलेला आहेः

" जद कोपे रघुनाथ, धनुष्य चढाय लीनो ।
दाहनसें बांइ बोली, महा-कोप करकें ॥ " वगैरे

चंद.

" तेज तम अंशपर, कान्ह ज्यम कंसपर ।
त्यों मिलेच्छ वंशपर, शेर शिवराज हैं ॥ " वगैरे.

भूखन.

---

*या कवीची एक मजेदार आख्यायिका–कविता येथे देणें प्रसंगोपात्त गैर होणार नाही. एकदा संस्थानिक राजा–महाराजांच्या मेळाव्यांत या कवीला शीघ्र कविता बोलण्याचा आग्रह झाला. स्पष्टवक्ता म्हणून त्यांची प्रसिद्धि होती. फार आग्रह झाल्यावर तो पुढील कविता त्या प्रसंगीं बोललाः

" कोइ घांचनके, कोइ मोचनके; कोइ लाडकवाय लुहारनके ।
कोइ नायउके, कि तंबोलनके; कोइ सांइ, सुतार, कुचारनके ॥
कोइ धोवनके, कोइ चोवनके; कोइ मेमनके, को कुंभारनके ।
ऐसे मिलि सब राज करे न्हां; जोर चले कहां चारनके ! ॥ "

आपण सूर्यवंशी, चंद्रवंशी वगैरे मिशांवर ताव देऊन सांगणाऱ्यां राजेलोकांना " तुम्हांपैकी कोणी तेलणीच्या पोटचे, कोणी चांभारणीच्या, कोणी लोहारणीच्या तर कोणी न्हाविणीच्या " वगैरे त्यांची खरी वंशावळ त्यांच्या तोंडावर बिनघोक सांगून हा कविराज आपल्या घोड्यावर बसून तत्काल पसार झाला ! हे ' चारण ' कवि ' बारोट ' ( 'ब्रह्मभाट' ) जातीचे असून राजेलोक त्यांना ' मामा ' म्हणत व त्यांनी कमीजास्ती वर्तन केलें, तरी त्यांना क्षमा करीत. चारणांबद्दलची बाकीची माहिती प्रसिद्धच आहे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

वरील उदाहरणांत ‘ कवितां ’तील अक्षरसंख्येचा नियम पाळलेला आहे, पण एकदोन अक्षरें जास्त आलेलीं अनियमित उदाहरणेंहि पुष्कळ मिळतात. या छंदाची आणखी माहिती हिंदी छंदोग्रंथांत पाहावी.

[ मागील ‘ घनाक्षरी ’वरील माझ्या लेखांत रघुनाथ पंडितकृत नलदमयंती आख्यानांतील एका घनाक्षरीचें ‘ ओवीशीं जास्त मिळतें ’ उदाहरण ‘ तया इन्द्रा करीं धरी ’ वगैरे दिलें होतें. तपशीलवार पाहतां असें दिसून येतें की, या आख्यानांत रघुनाथ पंडिताने घनाक्षरी छंद निरनिराळ्या ठिकाणीं मिळून निदान ११ वेळां वापरला आहे ( नवनीत इ. स. १८७८ ची आवृत्ति ). पैकी (१) ‘ इन्द्र त्रैलोक्य-नायक ’ (२) ‘ तया राजसौधान्तरीं ’ (७) ‘ इन्द्रादिक् तेही अधिप ’ (८) ‘ तेव्हां दमयंती सुंदरी ’ (१०) ‘ चौघे श्रेष्ठ सुरेश्वर ’ (११) ‘ नानापरीचें मिष्टान्न ’ ह्या चरणांनी सुरू होणारे संच नवनीताच्या उक्त प्रतींत ‘ओव्या’ ह्या मथळ्याखाली दिलेले आहेत; पण त्या ओव्या नसून घनाक्षरीच आहेत हें तपासून पाहिल्यास निश्चित होतें. या आख्यानांतील ओव्या म्हटलेल्या पद्यांत त्याचप्रमाणे घनाक्षरी मथळ्याखालील पद्यांत दोन्हींतहि ८।८।८।७ हा चरणाक्षरनियम पाळलेला असून क्वचित् ‘ शोभा तेथील पाहतो ’ [ चौथा चरण, ‘ ओवी ’ (१) पैकी दुसरी, श्लो सं. १७५ ], ‘ तरी आम्ही परपुरुषासी । वदणे मर्यादा नोहे ॥ ’ [ तिसरा व चौथा चरण ‘ घनाक्षरी ’ (४) पैकी पहिली; श्लो. २०० ], ‘ तंव ते बोले सुकुमार । चन्द्राकार-वदनातें ॥ ’ [ तिसरा व चौथा चरण ‘ घनाक्षरी ’ (५) पैकी दुसरी; श्लो. २०६ ] वगैरे कांही चरणांतून ० अशीं खुणा केलेलीं जास्त आलेलीं एक वा दोन अक्षरें अपवादात्मक समजलीं पाहिजेत. या अपवादांना नियम समजून अगर हस्तलिखिताधारें संपादकांनी घनाक्षरीचें ओवी केलें असावें. पहिल्या तीन चरणान्तीं लघु किंवा वास्तविक अकारान्त अक्षर असण्याचा नियम रघुनाथ पंडिताने अर्ध्यांअधिक ठिकाणींच फक्त पाळला आहे. वामन पंडिताच्या ‘ भरतभाव ’ वेच्यांत व ‘ नृसिंहावतार चरित्रां’त घनाक्षरी दोन दोन वेळां उपयोजिली आहे ( पाहा नवनीत ). त्या चारी संचांतील सुमारें २८ घनाक्षरी-पद्यांत ८।८।८।७ हा चरणाक्षरसंख्येचा नियम वामनाने चार-सहा अपवाद सोडून चांगलाच पाळला आहे, आणि पहिल्या तीन चरणांतील शेवटचें अक्षर अकारान्त असण्याचा नियम वामनाने अगदी कसोशीने पाळला आहे. यांपैकी अक्षरसंख्येचा नियम रघुनाथ पंडिताने ठीक ठीक पाळला आहे; मात्र चरणान्त अकाराचा नियम त्याने पाळलेला नाही, त्यावरून म्हणावें लागेल की, घनाक्षरीचा हा दुसरा नियम सर्वमान्य नव्हता अगर तो रघुनाथ पंडितास माहीत नव्हता. समोच्चारित छंदांत मात्रिक नियमाचें महत्त्व नसलें, तरी उच्चारपरिणामाच्या दृष्टीने तें अवश्य आहे.

‘नवनीतां’त ‘ ओव्या ’ हा चुकीचा मथळा घनाक्षरीला कित्येक ठिकाणीं ( निदान ६ ठिकाणीं ) देण्यांत आला आहे. नवनीतांतील या आख्यानांत ओव्या नाहीतच. ही चूक नवनीतांतील पुढल्या आवृत्तींत अगर प्रियोळकर-संशोधित ‘नलदमयंती आख्यानां’त सुधारली गेली असेलच. ]

## ( ७ ) आर्ष व शिथिल रचना ?

हें विशेषण ओवी, अभंग व घनाक्षरी यांना सर्वच मराठी छंदोलेखकांनी लावलें आहे. पैकी घनाक्षरीचा खुलासा मागे केलाच आहे. आता अभंगाच्या शिथिलतेबद्दल विचार करूं.

पद्यरचनेंत खालील कारणांनी शैथिल्यदोष उत्पन्न होऊं शकतो.

(१) अक्षर किंवा मात्रा यांची संख्या कमजास्त होणें.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

(२) गण-विपर्यय होणें.

(३) यतिभंग.

वरीलपैकी फक्त अंक (१) चा दोष अभंगांत असल्याचें सकृद्दर्शनीं दिसतें, त्याचें निराकरण खाली करीत आहे. त्यांत मात्रा या अक्षरावलंबी असल्यामुळे अक्षरसंख्यादोषांत मात्रासंख्यावैगुण्याचा अंतर्भाव होऊं शकतो, आणि समोच्चाराच्या दृष्टीने अभंगाचा विचार येथे कर्तव्य असल्यामुळे चरणाक्षरांच्या कमजास्तीपणाचीच बाब विचारार्ह आहे; ती येणे-प्रमाणे—

( अ ) कमी अक्षरें—अभंगांतील एखाद्या चरणांत कमी अक्षरें असतात, व तीं तशीं बहुतेक पालुपदाच्या ( ध्रु. ) म्हणजे सुरुवातीच्याच चरणांत असतात; उदा०—

( १ ) " दुर्बुद्धि ते मना ( = ६ अक्षरें ) । कदा नुप्जो नारायणा ॥ "

( २ ) " बोलणेंचि नाहीं ( = ६ अक्षरें ) । आतां देवावीण कांहीं ॥ "

क्वचित् दुसऱ्या चरणांत दोन अक्षरें कमी असतात अशींहि उदाहरणें सापडतात; तो सविराम चरण मानला पाहिजे.—

" मऊ मेणाहूनी आम्ही विष्णुदास । कठिण वज्रास भेदूं ऐसे ऽ ॥ "

एखाद्या चरणांत एकदोन अक्षरें कमी असतात तीं वैविध्य आणण्यासाठी मुद्दामच कमी ठेवलेलीं असतात. वैचित्र्याचा हा प्रकार Variation म्हणून इंग्लिश कवितेंत पुष्कळ वापरला जातो, हें प्रसिद्धच आहे. संस्कृत छंदांत या वैचित्र्याला जागा नाही, पण एकाच छंदांतलीं सुरुवातीचीं कांहीं अक्षरें कमी करून किंवा वाढवून अगर गुरूची पूर्ति लघूने करून वैविध्य आणण्याची रीत संस्कृतांत होती; मात्र त्यामुळे होणाऱ्या प्रकाराला नवाच छंद मानला जात होता. संस्कृत छंदांच्या या जखडपणामुळेच प्राकृत भाषांत गणिक छंद कमी होऊन मात्रावृत्तांची निर्मिति वाढीस लागली.

दुसरें कारण : भजनी पद्य या नात्याने अभंगाच्या प्रथम चरणाला गेय चिजांच्या ' अस्ताई 'सारखें–पालुपदांसारखें–महत्त्व आहे, त्यामुळे त्या चरणावर जोर आणण्याकरिता कांही अक्षरें कमी करून एकप्रकारची तालाची ' आड ' उत्पन्न करण्यांत आली. सारांश, ही क्रिया सहेतुक असल्यामुळे तो दोष नसून गुण आहे, हें उघड आहे.

( आ ) जास्ती अक्षरें—

( १ ) वरील ( १ ) मध्ये ' नुपजों ' त ' प ' जास्ती आहे, तो ' नुप्जो ' असा वाचावा लागतो.

( २ ) वेठीं धरिल्या दावी भाव । तुका म्हणे न लगे वाती ॥

शेवटच्या उदाहरणांत ' धर्ल्या ' व ' नल्गे ' असें वाचावें लागेल. याप्रमाणे मुद्दाम जोडाक्षरें करून वाचावें लागेल. असे कित्येक शब्द अभंगांत येतात, ते असे—' केविल्-वाणें,' ' भर्लें,' ' आचर्णाशी,' ' घड्ल्या,' ' धीवर्,' ' दिवस्,' ' येळ्कोट,' ' मग्,' ' बर्वें,' ' केशव् राजा,' ' उपचार्,' ' तळ्मळी,' ' जड्ला,' ' गर्दभ्,' ' करितां,' ' उप्कार,' वगैरे. एका अभंगांत असे एक-दोन शब्द येतात, तथापि ह्या ' दोषा 'पासून अलिप्त असलेले अभंगहि पुष्कळ आहेत.

वास्तविक अभंगांतील अशा तऱ्हेचे लघूचे व्यंजनोच्चार हे शुद्ध मराठी आहेत असें समजल्यास तो दोष मानण्याचें कारण नाही आणि दोष मानलाच तर तो भाषादोष मानावा. भाषादोष अशासाठी की, आमचे प्रमुख अभंगकार संस्कृत भाषाभिज्ञ नव्हते.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

कित्येक निरक्षरहि होते. बहुतेक ग्रामीण कवि होते. मराठी साहित्यहि तेव्हा बाल्यावस्थेंत होतें, त्यालाच अनुलक्षून अभंगादिकांना कोणी ' आर्ष ' म्हणत असतील तर म्हणोत. पद्याला व मराठी पद्याच्या भाषेला घट्ट संस्कृत वळण पहिल्याने वामन पंडिताने लावलें व ती पकड मराठी वृत्तरचनेंत तरी पुढे पक्की होऊन बसली. अर्थात्, वृत्तांच्या बाबतींत ही इष्टापत्तीच होती, असें समजतां येईल. सारांश हा की, अभंगादि पद्यरचनेला संस्कृत छंदाहून अलग नियम आहेत हें आधी ध्यानांत घेतलें पाहिजे. मराठी भाषा संस्कृताहून अलग होत गेली तसतसें तिचें उच्चारस्वरूपहि भिन्न होत गेलें. मराठी शब्दांचें हें भिन्न उच्चारस्वरूप जमेस धरून अभंगादि अस्सल मराठी पद्यांचा विचार केला गेला पाहिजे. अभंगकार हे अस्सल मराठी पद्यकार होते. पुढच्या काळांतील मराठी पद्यरचनेवर संस्कृत छंदांनी आक्रमण केलें. त्यामुळे मराठी पद्यांतले शब्दोच्चार संपूर्णपणें संस्कृतसारखे म्हणजे कृत्रिम होऊं लागले. मराठी गद्यांत मात्र शब्दोच्चारांचा विकास होऊन त्यांना आजचें स्वरूप ( कित्येक लघूंचें व्यंजनोच्चार हें ) प्राप्त झालें आहे. या दृष्टीने पाहिल्यास अभंग-पद्यांची ही आज अशुद्ध दिसणारी भाषा वास्तविक जास्त शुद्ध आहे असें म्हणावें लागतें.

या सर्व घटना ध्यानांत घेतल्या तर अभंगादि शुद्ध मराठी पद्यप्रकारांना ' आर्ष ' किंवा ' शिथिल ' पद्यवर्ग म्हणून हिणविण्याचें कारण नाही. तो मराठी भाषेचा उच्चार-विशेष समजावा; पण ज्यांना हें कबूल नसेल त्यांनी तो अभंगादि पद्यांचा मूळ स्वभाव ( किंवा स्वभावदोष ) न मानतां कवींचा भाषादोष वा रचनादोष मानावा, म्हणजे झालें; कारण कोणत्याहि पद्याचा छंदःशास्त्रदृष्ट्या विचार करणें आवश्यक असतां, त्यांत कांही त्रुटि असतील, तर त्या त्रुटि म्हणूनच बाजूस ठेवून उक्त पद्यांचें शुद्ध स्वरूपच विचारांत घ्यावयाचें असतें.

लघु अक्षरांचे व्यंजनासमान उच्चार जुन्या मराठींतील कांही ' पदां ' तहि अल्पांशाने आढळतात, त्यांचीं एक-दोन उदाहरणें खाली देत आहे :—

( १ ) " ज्याचें त्यानेंच् अन्हित् केलें ।
येथें कोणाचें काय् वा गेलें ! ॥ "

( २ ) " निजलिस् काय् ग ऽ ।
ऊठ्; तंबाकू देय् ग ऽ ॥ "

[ यांपैकी तंबाकूवालें दुसरें उदाहरण हें एकनाथकृत पद आहे, त्याचे शब्द मी स्मरणाने येथे दिले आहेत. ] पद्यांतहि गद्योच्चार कायम ठेवण्याचा सत्प्रयत्न कै. कुंटे यांनी ' शिवाजी ' काव्यांत केला होता, पण त्यानंतर दुसऱ्या कवींनी न हाताळल्यामुळे रूढ मराठी कवितेंतील शब्दोचार कृत्रिम राहिले आहेत.

[ इतका बचाव करूनहि कांही थोड्या अभंगांतील अक्षरसंख्या बरीचशी अनियमित आहे ही गोष्ट मान्यच करावी लागेल. उदाहरणें द्यावयाचीं असल्यास श्रीज्ञानेश्वरांच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या ( ' गौळणीचे ' वगैरे ) अभंगांत तीं जास्ती सापडतील. या अभंगांच्या भाषेची घडण व ठेवणहि जुनाटच लागते. यानंतरच्या कालक्रमानुसार नामदेवरायांच्या अभंग-रचनेंत असला अनियमितपणा, तुकाराम किंवा रामदास यांच्या अभंगापेक्षा जरा जास्तच सापडतो. अशा अभंगांपैकी ओवीसमान दिसणारीं उदाहरणें वर दाखविलींच. नामदेवकृत अभंगांत पुढील उदाहरण अन्य प्रकारच्या अनियमितपणाचें सापडतें.

" माता पिता बंधु भगिनी इष्ट मित्र विठ्ठला तूं गा ।
बापा यावें भेटावें विसांवा माझा ( विठ्ठला ) तूं गा ॥ " वगैरे



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

येथे " माता.........इष्ट मित्र । विठ्ठला तूं गा ॥ " याप्रमाणे दरेक ओळींत 'विठ्ठला तूं गा ' हें पालुपद जास्तीचें समजावें लागेल. " रात्र काळी घागर काळी । यमुनाजळें हीं काळीं वो माय । " त्यांत अनियमिततेसह " वो माय " हें पालुपद अवघड आहे. अशा पद्यांना अभंगवर्गात वास्तविक घालतां कामा नये. उपरान्त

" मज चालतां आयुष्यपंथें । तारुण्यवन पातलें तेथें ।
मदमत्सरादि श्वापदें बहुतें । आलीं कळकाळीत मजपाशीं ॥ "

ही रचना ओवीसमान स्पष्टच आहे. त्याचप्रमाणे " तूं अवकाश मी भूमिका । तूं लिंग मी साळुंका । " इत्यादि हीहि तशीच आहे.

नामदेवरायांच्या रचनेंत कांहीं पद्यें ' पद '-प्रकार आहेत. उदा०—

( १ ) " पतीत–पावन नाम ऐकुनी आलें मी द्वारा । " इत्यादि.

( २ ) " चेइला तो जाण रे सद्‌गुरुवचनीं निर्धारें ।
विपरीत मानवा विसर पडला कंठीं जया परिहार रे ॥ "

( ' नामदेवाचीं भजनें ' विनोबाकृत संग्रह, पृ. ८०. )

' आरती ' हा पद्यप्रकार ' पद ' नामक रचनेंत सहजच समाविष्ट होतो, हें पुढे दाखवूंच. ' युगें अठ्ठावीस० ' ही नामदेवरायांची आरती अतिप्रसिद्ध व लोकप्रिय आहे. आरती-गायन गुजराथींतहि आहे. मराठ्यांच्या दरेक आरती-गायनाचा शेवट " घालिन लोटांगण, वंदीन चरण ' इत्यादि पद्य धावत्या तालासुरांत गाऊन करण्याचा कठोर रिवाज आहे; त्याप्रमाणे गाइलें असतां तो ' पद '-प्रकार वाटतो, पण वास्तविक तो षडाक्षरी अभंगच मुळांत आहे:

" घालीन लोटांगण । वंदीन चरण ।
डोळ्यांनी पाहीन । रूप तुझें ऽऽ॥ "

हा अभंगाच्या रीतीने म्हणावयाचा असल्यास समोच्चारित म्हटल्यासच सुघड वाटतो; विशेषतः वरीलपैकी दुसऱ्या चरणांसारखे चरण तर लघु-गुरुप्रमाणे ' म्हणणें ' सुश्राव्य होणार नाहीच, समोच्चारितच ' म्हणावे ' लागतील.

खालील दोन्ही रचना अनियमित ' पद '-प्रकार वाटतात:

( १ ) " परब्रह्म विश्वाकारें अवतरलें भक्तिकाजा ।
मूर्ति सुनीळु सांवळी, केशिराजु स्वामी माझा । " इत्यादि.
( कित्ता पृ. ३१. )

( २ ) " गेलिया वृंदावनीं तेथें देखिला कान्हा ।
सवंगडियामाजी उभा, ध्यान लागलें मना ॥ " ( कित्ता पृ. ३२. )

खालील पद्याची घडण व झोक अगदी शिशुगीताप्रमाणे आहे:—

" मुक्ताफळ-नथ नाकीं । चरणीं ल्याली वाळे वांकी ।
पीतांबरें अंग झांकी । कृष्णम्मा माझी ॥
खांद्यावरी कांवळी । पायघोळ लांबली ।
पांघरली धाबळी । कृष्णम्मा माझी ॥ " ( कित्ता पृ. ३१. )

नामदेवांच्या नांवावर कांही हिंदी रचना आहे, ती उघडच ' पद '–प्रकारांत जाईल:

( १ ) " मैं बउरी, मेरा राम भतारु ।
राचि रचि ताकउ करउँ सिंगारू ॥ " वगैरे ( कित्ता पृ. ६९. )

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

( २ ) " सभै घट रामु बोलै, रामा बोलै ।
रामविना को बोलै रे ॥ " इत्यादि ( किता पृ. ६४. )

( ३ ) " हंसत खेलत तेरे देहुरे आइआ ।
भगति करत नामा पकरी उठाइआ ॥ " इत्यादि ( किता पृ. २०. )

यांपैकी अंक (३) ची रचना बंगाली समोच्चारित छंद, जो मायकेल मधुसूदन दत्त यांनी प्रचारांत आणला, त्याप्रमाणे वाटते. ( या पद्यांत " जाद मराइआ । छीपेके जनमि " असा " मराठा शिंपी ' जातीचा मला वाटतें उल्लेख आला आहे, त्या आधारें हें पद्य नामदेवकृत स्पष्टच आहे. ) नामदेवांच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या इतर बहुतेक हिंदी पद्यांत रामभक्तीचा महिमा गाइलेला आहे, पण नामदेवरायांनी उत्तर हिंदुस्थानांत रामभक्तीचा प्रचार असलेला पाहून आपल्या पंजाब येथील वसति–कालांत रामपर पद्यें केलीं असतील, हें संभवनीय आहे. " लोभ लहरि अति नीझर बाजै ।" इत्यादि ( किता. पृ. ४८ ). थोड्याशा पद्यांत नामदेवांच्या प्रिय ' विठला ' चें नांव आलें आहेच.

अशा तऱ्हेने अनेक अभंगांची अक्षरसंख्या कांही अंशीं अनियमित आहे, म्हणून 'अभंग' ही पद्य–रचनाच मुळांत ' आर्ष ' व ' शिथिल ' अशी कांही लेखकांच्या मताप्रमाणे मानण्याचें कारण नाही; म्हणजे ' अनियमितपणा ' हा त्या रचनेचा नियम मानतां कामा नये. उलट, अनियमिततेंतून तिचे नियम शोधून काढणें, हें छन्दःशास्त्रकारांचें काम आहे; कारण मुक्तच्छंदांचा अनियमितपणा हा एक आवश्यक गुण असतो, तसा तो अभंग–पद्याचा असलेला दिसत नाही. त्यांत कित्येकदा कोठकोठे आलेला अनावश्यक अनियमितपणा हा कवितकारांच्या कमकुवतपणामुळे, अज्ञानामुळे किंवा निष्काळजीपणामुळे आलेला आहे, हें उघड आहे.

## ( ८ ) अभंग-पद्याचें वैशिष्ट्य

दरेक पद्याकृतीचा एक विशेष गुण असतो, हें मागे सांगितलेंच. अभंगवाणींतील काव्याचें बाह्यांग व अंतरंग पाहिलें, तर अभंग-पद्याचें वैशिष्ट्य ध्यानांत येण्यास हरकत नाही. खडे तात्त्विक बोल सांगण्यासाठी अभंगाइतका दुसऱ्या कोणत्याहि पद्याचा उपयोग होऊं शकत नाही. पाल्हाळ, अलंकारिकपणा आणि गौल्य हा ओवीपद्याचा स्वभाव आहे; पण अभंगांतील वर्णनहि टुसटुशीत आणि सुटसुटीत असतें. मराठी भाषेची प्रकृति राकट, रेखीव, सचोट आणि तत्त्वभेदक आहे व तिचा उत्कर्ष अभंगवाणींत पराकोटीस पोहोचला आहे. मराठीचा आत्माच अभंग-पद्याच्या शरीराने यथातथ्य साकार झाला आहे ! मराठी काव्य-मंदिराचा ओवी हा सभामंडप आहे, तर अभंग हें गाभारा–शिखर आहे ! हिंदी दोहरा–साहित्य अंशतः अभंगांच्या गुणांचें आहे, पण तशा बांधणीचें नाही. ओवीप्रमाणेच अभंगाच्या तोडीचें तात्त्विक साहित्यहि अन्य भारतीय भाषांत झालेलें नाही. उपदेश, दंभस्फोट, तत्त्वचर्चा, भक्ति आदि विषयांवरील काव्याची भाषा व मांडणी एका विशेष प्रकारची असते व त्याला अभंग-पद्याचें स्वरूप अनुकूल व आवश्यक आहे.

## ( ९ ) समोच्चारित ' पदें '

तालसुरावर ' गाइलें ' जाणारें पद्य तें ' पद ' होय. पद हा या अर्थाचा शब्द खास मराठी आहे. याचा संस्कृत पर्याय ' गीत ' ( अष्टपदी वगैरे ) हा आहे. पदांतील अक्षरांचा उच्चार लघुगुरुप्रमाणेच होतो, पण क्वचित् समोच्चारित पदेंहि असतात. याचें प्रसिद्धपैकी एक उदाहरण,



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

" पांडुरंग, श्री-( शिरि )-रंग, भज रे म, नाऽऽऽऽ । "

४ ४ ४ ४

यांतील चरण षोडश–मात्रिक असून हें संत–तुकाराम–कृत आहे.

( १० ) प्रचलित समोच्चारित रचना

मराठींतील समोच्चारित पद्यरचना मृत झालेली नाही. कळत–नकळत आजहि आपल्या कवींच्या हातून तिचें सर्जन थोडकेंच का होईना, पण चालू आहे. आधुनिक समोच्चारित पद्यांपैकी माझ्या अवलोकनांत आलेलें प्रा. मायदेवकृत एक पद्य उदाहरणार्थ खाली देत आहे.

" झोका देऊं याऽऽऽ। झोका देऊं याऽऽऽ ॥
झोक्यासवें माहेराला गात जाऊं याऽऽऽ ॥
पश्चिमेचा झंझावात ।
रानफुलें उफाळत ।
नाचऱ्या या पोरासवें नाच खेळुं याऽऽऽ ॥ १ ॥ " वगैरे.

या गीतांतील दरेक अक्षर सारख्या कालमानाचें आहे, व कविसंमेलनांतून प्रसिद्ध कवींकडून त्याच म्हणजे समोच्चारित पद्धतीने तें म्हटलें गेलेलें आहे व जातें हें प्रसिद्ध आहे.

या चालीचीं दरोबस्त पद्यें समोच्चारितच असतात, हें विशेष.

( ११ ) अभंग हा ' छंद ' किंवा मात्रावृत्त ?

अभंगाला समोच्चारित न मानणारे छंदःशास्त्रकारहि ( कै. माधवराव आदिक ) त्यांची वर्गवारी केवळ अक्षरसंख्याक पद्यवर्गात करतात व अशा अक्षरसंख्याक ( = गणमात्रांचा नियम नसलेल्या ) स्वतंत्र पद्यवर्गाला ' छंद ' हें नांव देणें पसंत करतात. अन्यमतें अभंग पद्य रचना मात्रावृत्तांत ढकलली जाते, त्याबद्दलची भवति न-भवति येथे आवश्यक वाटत नाही.

( १२ ) संस्कृत समोच्चारित पद्यवर्ग.

संस्कृत भाषेंतील पद्यांत समोच्चारित पद्यवर्ग होता किंवा काय, हा विवादात्मक प्रश्न राहील. ' संगीत रत्नाकरा 'चा कर्ता शार्ङ्गदेव याचा छंदांवर ' छंदोविचिति ' नांवाचा ग्रंथ होता, त्यांतून टीकाकार कल्लिनाथ याने टीकेंत दिलेल्या उताऱ्यांवरून एक निव्वळ अक्षर-संख्याक पद्यवर्ग शार्ङ्गदेवाने मानला होता, असें दिसतें. शिवाय अशा अक्षरसंख्याक वर्गाचें म्हणून त्याने ' समानी ' पद्याचें उदाहरण दिलें आहे. ' छन्दोविचिति ' ग्रंथ उपलब्ध नाही, पण ' संगीतरत्नाकरां 'तील प्रबंधाध्यायांत ' एला, ' ' ढेङ्की ' आदि प्राचीन ( ' गांधर्व ' ) प्रबंध सांगतांना पद्यरचनेचे ( १ ) वर्णन ( २ ) गणज व ( ३ ) मात्रिक असे तीन वर्ग सांगितले आहेत. " .... .... .... ... वर्णिका, गणिका तथा ।
मात्रिका; वर्णजैर्वृत्तैर्गणजैर्मात्रिकैरपि " ॥ १५१ ॥

टीका—" तत्र वर्णसंख्यामात्रनिर्वृत्तानि वृत्तानि वर्णजानि, समानी–प्रभृतीनि । " म्हणजे केवळ अक्षरसंख्येच्या गणनेवरून करण्यांत येणारा पद्यवर्ग तो ' वर्णन '. अर्थात् या वर्गाला गणमात्रानियमांचें बंधन नव्हतें, असें म्हणावें लागतें. ' समानी 'चें उदाहरणः

" ओं नमो जनार्दनाय, दुष्टदैत्य-मर्दनाय ।
पापबन्ध-मोचनाय, पुण्डरीक-लोचनाय ॥ "

असें दिलेलें समोच्चारितरीत्या वाचल्यास आपल्या घनाक्षरीप्रमाणे आहे, हें दिसून येईल. मात्र यांतील चौथ्याहि चरणांत आठ अक्षरें आहेत व चारी चरण एकयमकी आहेत.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

'समानी' संज्ञेचा ध्वन्यर्थ 'समोच्चारित' असा कदाचित् काढतां येईल. 'समानी'चें वाचन लघुगुरुप्रमाणे केल्यास तें चक्कच गणबद्ध ( ‾ ˘, ‾ ˘, ‾ ˘, ‾ ˘ ) वृत्त होईल; मग त्याला केवल वर्ण-संख्याक म्हणणें हेंहि चुकीचें होईल. रत्नाकाराने 'एला' प्रबंधाचे प्रकार वर्णन करतांना वर्णगण आणि मात्रागण असे 'गणां'चे दोन प्रकार सांगितले आहेत. पैकी पहिला 'मयरसतजभन' हा सुप्रसिद्ध अष्टप्रकारी गणवर्ग वर्णगण होय. दुसरा गणवर्ग म्हणजे 'मात्रागण' नांवाचा मात्रा-संख्याक आहे; हे गण 'छगण' (ऽऽऽ); 'पगण' (ऽऽ।); 'चगण' (ऽऽ); 'तगण' (ऽ।) व 'दगण' (ऽ) असे पांच असून त्यांची 'छ,' 'प' वगैरे नांवें हीं सहा (छ), पांच (प) वगैरे संख्यादर्शक देशी अंक-नामांच्या आद्याक्षरांवरून ठेवलेलीं आहेत.

केवळ अक्षर-संख्येच्या (प्रतिपाद) गणनेप्रमाणे 'अत्युक्ता' वगैरे प्राचीन छंदःप्रकार व त्यांचे प्रस्तार छंदःशास्त्रांत प्रसिद्ध आहेत, पण त्यांतहि लघुगुरुप्रपंच धरला जातो; पण 'एला'-प्रकारापैकी 'वर्णैला' प्रबंध (= गीत) रत्नाकरादिकांनी सांगितले आहे, त्या पद्यरचनेला फक्त वर्ण-संख्येचाच तेवढा एक नियम लागू होत असे आणि गणमात्रांचा कोणताच नियम नसे, हा विशेष होय.

"गणमात्राद्यनियता वर्णैला वर्णसंख्यया ॥ १०६
षडक्षरादङ्घ्रिखण्डादेकोनत्रिंशदक्षरम् ।
यावदेकैकवृद्धयैलाश्चतुर्विंशतिरीरिताः ॥" १०७

'वर्णैलां'ना गणमात्रा नियम नाहीत, फक्त वर्णसंख्यानियम आहे, असा खुलासा यावर 'सुधाकर' टीकेंत सिंहभूपालाने केलाच आहेः—"यासु गणमात्रादिनियमो नास्ति, केवलं वर्णसंख्यानियमेनोपबद्धास्ते वर्णैलाः ।" दरेक चरणांत सहापासून एकोणतीसपर्यंत एक-एक-अक्षरवृद्धि केली असतां या 'वर्णैलां'चे एकूण चोवीस प्रकार 'मधुकरी', 'सुस्वरा' वगैरे होतात. पैकी अकरा-अक्षरी 'वर्णैला' प्रभंजनी नांवाची रत्नाकराने सांगितली आहे. (या नांवाचें साम्य अभंग शब्दाशीं वाटतें, पण तें काकतालीय न्यायानेच असावें). 'एला' गीतें लाट, गौड, आंध्र व द्रविड भाषांतहि होतीं, त्यांचें संक्षिप्त वर्णन रत्नाकराने दिलें असून नान्यभूपालाच्या (हस्तलिखित) भरत-भाष्य ग्रंथांत त्यांचीं उदाहरणेंहि दिलीं आहेत. सारांश, संस्कृत व प्राकृत भाषांत प्राचीनकाळीं केवळ वर्णसंख्येवर आधारित पद्यरचना होती, हें निःसंशय. हीं पद्यें समोच्चारित होतींच असा पुरावा देतां येत नाही; तथापि तीं समोच्चारित नसतील, तर त्यांचा वर्णसंख्याक गायनी हिशेब नीट राहूं शकलाहि नसता असा तर्क मात्र आपसुखच करतां येतो.

## 'अभंग' शब्दाचा अर्थ

'भंग' शब्द प्रकारार्थींहि संस्कृतांत आहे. एकच 'प्रबंध' (गीत) निरनिराळ्या रागांत किंवा तालांत गाइला जाण्यासाठी रचलेला असे. अशा गीतांचे 'त्रिभंगी' व 'पंचभंगी' असे दोन प्रकार सं. रत्नाकराने दिले आहेत (४।२८२, २८३, २६५, २६६). पैकी त्रिभंगी प्रबंध तीन रागांत व तालांत; किंवा त्रिभंगी नांवाच्या छंदांत, किंवा निरनिराळ्या तीन छंदांत किंवा तीन देवतांच्या स्तुतिपर गाण्यासाठी रचलेला असल्यामुळे, त्याचें त्रिभंगी हें नांव ठेवल्याचें रत्नाकराने म्हटलें आहे. नामकरणाच्या या धोरणावर लघुगुरुमात्राप्रकारहीन वा गणप्रकारांचा अभाव असलेल्या पद्यरचनेस 'अ'-भंग नांव सार्थ ठेवलें गेलें असल्याचा संभव आहे. ● ● ●



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

सु रे श म. डो ळ के

# नरेंद्र आणि भागवत-टीकाकार श्रीधर

## थोडें प्रास्ताविक

' महाराष्ट्र–साहित्य–पत्रिके'च्या एप्रिल–मे–जून १९५६ च्या अंकांत ( अंक ११७ ) ' नरेंद्रा'चा प्रतिभा-विलास ' हा माझा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यांत नरेंद्राच्या स्वतंत्र प्रतिभाविलासाच्या कांही स्थळांचें मीं दिग्दर्शन केलें आहे व अशा स्थळांत रुक्मिणीने श्रीकृष्णाला पाठविलेल्या ' पत्रिके 'वर विशेष भर दिला आहे. नरेंद्राच्या पूर्वी लिहिण्यांत आलेल्या रुक्मिणीस्वयंवराच्या एकाहि कथेंत ' रुक्मिणी–पत्रिके'चा उल्लेख नाही. रुक्मिणीने श्रीकृष्णाला लिखित पाठविलें असें ' भागवत, ' ' हरिवंश, ' 'पद्मपुराण' व ' विष्णुपुराण ' या रुक्मिणीस्वयंवराची कथा नमूद करणाऱ्या पुराण-ग्रंथांत कुठेहि म्हटलेलें नसतांना नरेंद्राने मात्र रुक्मिणीचें ' भावलिखित ' निर्माण करावें यांत त्याच्या भावसंकुल व कलाचतुर प्रतिभेचा विलासच नाही काय ?

## ' नरेंद्र आणि प्रा. डोळके '

पण, प्राचीन मराठीचे एक साक्षेपी अभ्यासक श्री. य. ग. फफे यांना माझें हें म्हणणें मान्य नाही. ' महाराष्ट्र–साहित्य–पत्रिके'च्या जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर १९५६ च्या अंकांत ( अंक ११८ ) ' नरेंद्र आणि प्रा. डोळके ' या शीर्षकाखाली त्यांचें एक विस्तृत पत्र प्रकाशित झालें असून रुक्मिणीने श्रीकृष्णाला पाठविलेली पत्रिका टीकाकार श्रीधराच्या समोर असलेल्या मूळ भागवताच्या एखाद्या प्रतींत असावी किंवा तेथे ती नसली तरी श्रीधराचार्यांच्या भागवतटीकेंत

रुक्मिण्या स्वयमेकांत लिखित्वा दत्तपत्रिकां ।
मुद्रामुन्मुच्य कृष्णाय प्रेमचिन्हामदर्शयत् ॥

असा त्याचा निर्देश असल्यामुळे व श्रीधराचार्य हे नरेंद्राच्या पूर्वी होऊन गेल्यामुळे लिखित रुक्मिणीपत्रिका हा, मी समजवों त्याप्रमाणे, नरेंद्राचा प्रतिभाविलास नव्हे असें त्यांनी प्रतिपादन केलें आहे. श्री. फफे यांना माझ्या लेखांत जी चूक (?) आढळली ती त्यांनी तत्परतेने माझ्या ध्यानांत आणून दिल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. त्यांनी इतरहि कांही आक्षेप माझ्या लेखावर घेतले आहेत. पण, त्या सर्वांचा उगम भागवत-टीकाकार श्रीधर हा नरेंद्राच्या पूर्वी होऊन गेला या त्यांच्या समजुतींत असल्यामुळे त्यासंबंधीचाच विचार मी थोडक्यांत येथे करणार आहे.

## ' रुक्मिणी–पत्रिका ' मूळ भागवतांतली ?

' रुक्मिण्या स्वयमेकान्ते—' हा श्लोक भागवताच्या एखाद्या प्रतींत असावा असें श्री. फफे यांचें म्हणणें. श्रीधराने भागवतावर ' भावार्थ ' लिहितांना भागवताच्या अनेक प्रती पाहिल्या असतील. त्यांपैकी एखाद्या प्रतींत वरील श्लोक असेल अशी कल्पना करायला हरकत नाही. पण प्रस्तुत श्लोक असलेली भागवताची एकहि प्रत जोंपर्यंत उपलब्ध होत नाही तोंपर्यंत, रुक्मिणी–पत्रिकेची कल्पना मूळ भागवताचीच असें समजण्यांत व नरेंद्राच्या प्रतिभेला पायबंद घालण्यांत काय अर्थ आहे ? भागवतांतच काय, पण ' नरेंद्रा 'च्या [ शके १२१४ ] पूर्वी लिहिण्यांत आलेल्या रुक्मिणीस्वयंवराच्या एकाहि कथेंत रुक्मिणी-पत्रिकेचा उल्लेख नाही.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## कै. काळे यांचीं विधानें

हेमाद्रीने केलेल्या श्रीधराचार्यांच्या भागवतटीकेच्या उल्लेखावरून भागवतटीकाकार श्रीधराचार्य हे हेमाद्रीपूर्वी होऊन गेले असें विधान कै. त्र्यंबक गुरुनाथ काळे यांनी केलें आहे.[1] व त्याच आधारावर श्री. फके यांनी 'भागवतटीकाकार श्रीधर हा नरींद्राच्या पूर्वीचा'[2] या आपल्या कल्पनेचा इमला उभारला आहे. म्हणून, आधी कै. काळे यांच्या मूळ विधानाचा विचार करूं.

वोपदेवाच्या 'हरिलीले'वर टीका करतांना हेमाद्रीने वारंवार श्रीधराचार्यांच्या टीकेचा उल्लेख केलेला आहे असें कै. काळे म्हणतात (पृ. ७७). श्रीधराचार्यांच्या भागवतटीकेचा हेमाद्रीने घेतलेला 'उतारा' म्हणून भागवतांतल्या 'शृण्वंति गायंति गृणंति साधवः' [१-५-११ व १२-१२-५१] या श्लोकांवर श्रीधराचार्यांनी केलेली

'साधवो महांतो वक्तरि सति शृण्वंति । श्रोतरि सति गृणंति ।
अन्यदा स्वयमेव गायंति कीर्तयंति ।' व 'वक्तरि सति शृण्वंति ।
श्रोतरि सति गायंति । नो चेत्स्वयमेव गृणंति ।'

ही टीका व वोपदेवाच्या 'हरिलीलें'तल्या 'एकादिनियमेनैतान्' या श्लोकावरील

"एकादीनि । किं च अन्यस्मिन् श्रोतर्युपस्थिते वक्ता भवेत् ।
स्वाधिके च वक्तर्युपस्थिते अभिमानं त्यक्त्वा स्वयं श्रोता भवेत् ।
उभयाभावे स्वयमेव शास्त्रार्थं चिंतयेत् । इत्येषाऽभ्यासप्रक्रिया ।
एतच्च 'शृण्वंति गायंति गृणंति साधवः' इत्यत्र स्पष्टीकृतमाचार्येण ।"

ही हेमाद्रीची टीकाहि कै. काळे यांनी उद्धृत केली आहे व लगेच 'याशिवाय, आणखी अनेक ठायीं श्रीधराचार्यांच्या टीकेचे हेमाद्रीने उतारे घेतलेले आहेत' असें म्हटलें आहे (पृ. ७८).

हेमाद्रीची वर उद्धृत केलेली टीका हा श्रीधराचार्यांच्या भागवतटीकेंतील 'उतारा' असें कै. काळे म्हणतात. पण वरील दोन्ही उताऱ्यांकडे वरवर जरी पाहिलें तरी हेमाद्रीने श्रीधराचार्यांचा 'उतारा'–Quotation–घेतलेला आहे असें म्हणतां येणार नाही व त्यावरून भागवतटीकाकार श्रीधर हा हेमाद्रीपूर्वी [इ. स. १२६०–१३०९][3] झाला असा निष्कर्षहि कुणाला काढतां येणार नाही.

श्रीधरी टीका मध्वाचार्यांहून प्राचीनतर असावी असेंहि विधान कै. काळे यांनी केलें आहे [पु नि., पृ. ७६]. पण मध्वाचार्यांनी आपल्या 'भागवततात्पर्यनिर्णयां'त हनुमत्, चित्सुख, शंकराचार्य इत्यादिकांच्या भागवतटीकांचा जसा उल्लेख केला आहे, तसा श्रीधरी टीकेचा केलेला नाही. भागवतावर ज्या टीका झाल्या त्या सर्वांत, बंगालमधल्या वैष्णवसंप्रदायाला भक्तीचें विशिष्ट वळण देणारी श्रीधराची टीका विशेष महत्त्वाची आहे. मध्वाचार्यांच्या पूर्वी श्रीधरी टीका झाली असती तर ज्यांनी भागवताच्या पायावर आपल्या संप्रदायाची उभारणी केली त्या मध्वाचार्यांनी, भागवतटीकाकारांच्या नामावलींत श्रीधरी टीकेचा खचित उल्लेख केला असता.

---

१. पुराणनिरीक्षण [चित्रशाळा, पुणें] पृ. ७७.
२. म. सा. पत्रिका [११८] पृ. ४१.
३. Prof. Keith : History of Sanskrit Literature [Oxford, 1928] P. 448.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

हेमाद्रीने ' चतुर्वर्गचिंतामणीं 'त [ इ. स. १२६०-१२७० ] ज्या श्रीधराचा उल्लेख केला[४] त्याचा ' स्मृत्यर्थसार ' [ इ. स. ११५०-१२०० ][५] हा धर्मशास्त्रावरचा ग्रंथ प्रसिद्ध आहे.[६] त्याच्याहि पूर्वी श्रीधर याच नांवाच्या लेखकाने प्रशस्तपादाच्या ' पदार्थ-धर्म-संग्रहा 'वर ' न्यायकंदली '[७] नांवाचा टीकात्मक ग्रंथ लिहिला असून [ इ. स. ९९१ ] कणादाच्या वैशेषिक तत्त्वज्ञानांत तो विशेष समजला जातो. पण ' न्यायकंदलीकार ' किंवा ' स्मृत्यर्थसार '-कर्ते श्रीधराचार्य म्हणजे भागवताचे टीकाकार श्रीधरस्वामी नव्हेत. कै. काळे हे या दोघांपैकी कुणाला तरी भागवतटीकाकार श्रीधर मानीत असावे.

## मध्व—श्रीधर

मध्वाचार्यांनी [ इ. स. ११९९-१२७८ ][८] आपल्या ' भागवततात्पर्यनिर्णय ' या भागवतावरील टीकेंत शंकर, हनुमत् व चित्सुख यांच्या भागवतटीकांचा उल्लेख केला आहे. श्रीधरी टीका यांच्या पूर्वी झाली असती तर भागवतटीकाकारांच्या नामावलींत त्यांनी श्रीधराचा उल्लेख अवश्य केला असता. अर्थात्, मध्वाचार्यांच्या काळापर्यंत [ तेराव्या शतकाचा उत्तरार्ध ] श्रीधराची भागवतटीका अस्तित्वांत नव्हती हें यावरून उघड दिसतें.

## चित्सुख—श्रीधर

Aufrecht यांनी Catalogus Catalogorum या ग्रंथांत[९] श्रीधरस्वामींबद्दल व त्यांच्या ग्रंथाबद्दल पुढील माहिती दिली आहे.

श्रीधरस्वामिन् pupil of परमानंद :

( १ ) भगवद्गीताटीका सुबोधिनी
( २ ) भगवद्गीतासारटीका
( ३ ) भागवतपुराणटीका–भावार्थ–दीपिका
( ४ ) विष्णुपुराणटीका–आत्मप्रकाश He used the commentary of चित्सुख.
( ५ ) वेदस्तुतिटीका from his commentary on the भागवतपुराण.
( ६ ) व्रजविहार
( ७ ) Some verses of his are given in पद्यावलि ( of रूपगोस्वामिन् )
( ८ ) पदार्थप्रकाशिका–पुराण-टीका ( ? )
( ९ ) सनत्सुजातीयव्याख्या बालबोधिनी[१०]

श्रीधराच्या ' भावार्थ-दीपिके 'वर ' भावार्थ-दीपिका-प्रकाश ' लिहिणाऱ्या वंशीधर-शर्मानेहि शंकर, हनुमत् आणि चित्सुख यांच्या भागवतटीका श्रीधराच्या पूर्वी झाल्या असें

४. 'आदिशब्दार्थः श्रीधरेण दर्शितः....' चतुर्वर्गचिंतामणि, पृ. २०.
५. P. V. Kane : History of Dharmaśāstra [ 1930 ], Vol. I, P. 337.
६. प्रका.—आनंदाश्रम प्रेस, पुणें, इ. स. १९१२.
७. प्रका.—Vizianagaram Sanskrit Series; Lazarus & Co. Benaras.
८. R. G. Bhandarkar : Vaiṣṇavism, Śaivism and minor Religious Systems ( Collected Works, Vol. IV, P. 83 ).
९. Part 1, P. 669.
१०. Cata. Cata. Part II, P. 160.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

म्हटलें आहे. गीतेवर टीका लिहितांना शंकराचार्यांची गीताटीका आपण विचारांत घेतली होती असें स्वतः श्रीधर म्हणतो.[११]

'आत्मप्रकाश' या श्रीधराच्या विष्णुपुराणावरील टीकेंत चित्सुखाच्या विष्णुपुराण-टीकेचें हुबेहूब प्रतिबिंब उमटलें आहे. किंबहुना, त्याचा 'आत्मप्रकाश' म्हणजे चित्सुखाच्या टीकेचें विशदीकरणच आहे असें म्हटलें तरी चालेल. चित्सुखाचा काळ इ. स. १२२०[१२]–१२८४ हा मानतात.[१३] अर्थात्, श्रीधराच्या भागवतटीकेचा काल हा त्यानंतरचा ठरतो. वरील विवेचनावरून इ. स. १३०० हा श्रीधराच्या कालनिर्णयाचा प्रारंभबिंदु धरायला हरकत नाही.

श्रीधर—चैतन्य

श्रीधराने भगवद्गीता, भागवत व विष्णुपुराण यांवरील आपल्या टीकाग्रंथांत शंकराचार्यांचें अद्वैत व भागवताची भक्ति यांचा सुंदर समन्वय घडवून आणला. त्या आधारावर माधवेंद्रपुरी व ईश्वरपुरी या गुरुशिष्यांनी भक्तिसंप्रदायाचीं मुळें बंगालमध्ये रुजविलीं व चैतन्याने स्वतःच्या अनुभवाने त्या वृक्षाला विशिष्ट आकार दिला. बंगालमधला वैष्णवसंप्रदाय श्रीधराच्या भागवतटीकेवर आधारलेला आहे असें म्हटलें तर त्यांत अतिशयोक्ति होणार नाही.

श्रीधराच्या पावलावर पाऊल टाकून विष्णुपुरीने भागवतांतील उत्कृष्ट उतारे निवडून 'भागवत-भक्ति-रत्नावलि' हा ग्रंथ लिहिला. त्यांतल्या

अत्र श्रीधरसत्तमौक्तिलिखने न्यूनाधिकं यद्भवे– ।
तत्क्षन्तुं सुधियोऽर्हत स्वरचनालुब्धस्य मे चापलम् ॥

या श्लोकांत[१४] विष्णुपुरीने श्रीधराच्या लेखनाबद्दल त्याला वाटत असलेला आदर व्यक्त केला आहे.

माधवेंद्रपुरीचा शिष्य ईश्वरपुरी याने[१५] चैतन्याला गया येथे कृष्णमंत्राची दीक्षा दिली होती.[१६] इ. स. १५०७ मधली ही घटना असावी.[१७] तेव्हापासून भागवत व विशेषतः भागवताची श्रीधरी टीका यांवर आधारलेला आपला संप्रदाय उभारण्याला चैतन्याने सुरुवात केली.

चैतन्य श्रीधरस्वामींच्या भागवतटीकेला फार मान देत असे. श्रीधराला त्याने 'जगद्-गुरु' म्हटलें आहे.[१८] श्रीधरस्वामींच्या टीकेहून वेगळा अर्थ सांगणारी टीका 'भ्रष्ट' आहे असें त्याचें मत होतें. असा वेगळा अर्थ सांगणाऱ्या एका वल्लभभट्टाला[१९] चैतन्याने

११. आपल्या गीताटीकेंत श्रीधराने शंकराचार्यांचा उल्लेख 'भाष्यकार' व 'श्रीमच्छंकर-भगवद्भाष्यकृद्भिः' [ अ० १३, श्लो० २० ] असा केला आहे.
१२. S. N. Dasgupta : A History of Indian Philosophy [ Cambridge, 1932 ] Vol. II, P. 147.
१३. A Journal of Mythic Society, January 1934, P. 278.
१४. S. K. De : Early History of Vaiṣṇava Faith and Movement in Bengal [Calcutta 1942] P. 14 (तळटीप).
१५. केह वले ईश्वर पुरीर सङ्ग हइते । कि वा देखिलेन कृष्ण-प्रकाश गयाते [लोचन]
१६. Vaiṣṇava Faith and Movement, P. 57.
१७. J. N. Farquhar : Outline of the Religious Literature of India [Oxford, 1920], P. 307.
१८. Vaiṣṇava Faith and Movement, P. 112 तळटीप.
१९. Vaiṣṇava Faith and Movement, P. 16 व P. 112 तळटीप.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अव्हेरल्याची [ ' चैतन्यचरितामृतां'तली ][२०] कथा प्रसिद्ध आहे.[२१]

वरील निरनिराळ्या तत्त्वज्ञांचा

श्रीधर — विष्णुपुरी[२२] — ईश्वरपुरी[२३] — चैतन्य[२४]

[इ.स.१३५०-१४००] [इ.स.१५०७] [इ.स.१४८५-१५३३]

असा क्रम लावावा लागेल.

**भक्तिरस : श्रीधर–रूपगोस्वामी**

रूपगोस्वामीने [ इ. स. १४९५-१५५० ] *आपल्या ' पद्यावली 'त श्रीधरस्वामी[२५] व विष्णुपुरी[२६] यांचे कांही श्लोक उद्‌धृत केले आहेत. श्रीधराने भागवतांतल्या ' मल्लानाम-शनिर्नृणां नरवरः—' या श्लोकावर [ १०-४३-१७ ] टीका करतांना

रौद्राद्भुतो च शृंगारो हास्यं वीरो दया तथा ।
भयानकश्च वीभत्सः शान्तः सप्रेमभक्तिकः ॥

असा भक्तिरसाचा स्वतंत्र उल्लेख केला आहे. रूपगोस्वामीने ' भक्तिरसामृतसिंधु ' व ' उज्ज्वलनीलमणि ' या ग्रंथांत भक्ति हा स्वतंत्र रस समजून त्याचें शास्त्रीय विवेचन केलें आहे.[२७] पण, रूपगोस्वामीच्याहि पूर्वी श्रीधराने रसमंडलांत भक्तीला स्वतंत्र स्थान दिलें होतें हें विसरून चालणार नाही. त्याची भूमिका साहित्यशास्त्रकाराची नसल्यामुळे त्याने भक्तीचें शास्त्रीय विवेचन केलें नसेल हा भाग वेगळा. असो.

**' भक्तमालां'तील आख्यायिका**

नाभाजीने आपल्या ' भक्तमाल ' या सुरस व चमत्कारिक आख्यायिकांच्या ' ग्वाल्हेर भार्षे'तल्या ग्रंथांत [ संवत् १६४२-८० ] ' विष्णुस्वामीसंप्रदाय दृढ ज्ञानदेव गंभीरमति, ' नामदेव व त्रिलोचन हे ज्ञानदेवांचे शिष्य; सोपानदेव, महानदेव व ज्ञानदेव हे तिघे बंधु, नामदेव हे वामदेवाच्या विधवा मुलीचे पुत्र इत्यादि विधानें केलीं आहेत. विष्णुस्वामीची

विष्णुस्वामी > ज्ञानदेव > नामदेव > त्रिलोचन् > वल्लभ

२०. श्रीचैतन्यचरितामृत [ कृष्णदास ] भा. ३, प्र. ७.
२१. Purnendu Narayan Sinha : A study of The Bhagwat Purana [Adyar, 2nd. ed. 1950] Preface P. xi.
२२. Outline of the Rel. Lit. Ind. P. 302, 375.
२३. ईश्वरपुरीने इ. स. १५०७ मध्ये चैतन्याला मंत्रदीक्षा दिली.
२४. डॉ. भांडारकर [Collected Works, Vol. IV, P. 119] व फर्कुहार [Out. Rel. Lit. Ind. P. 307] यांनी इ. स. १४८५-१५३३ हा चैतन्याचा काळ दिला आहे. डॉ. सुशील कुमार डे १४८६-१५३३ हा काळ देतात [Vaiṣ. Fa. & Mov. P. 51, 76].—ब्रजेंस याने मात्र चैतन्याचा निर्वाण-काळ इ. स. १५२७ हा दिला आहे. [Chronolgy of Modern India. P. 21]
* Vaiṣ. Faith & Mov. P. 119, 121.
२५. Aufrecht, Cat. Cat. Part I, P. 669.
२६. Vaiṣ. Faith & Mov. P. 15.
२७. S. K. De. 'The Bhakti-Rasa S'astra of Bengal Vaiṣṇavism' 'Indian Historical Quarterly' Vol. VIII, 1932, P. 643-688. किंवा Vaiṣṇava Faith & Mov. या ग्रंथांतील The Devotional Sentiments 'Rasa Śastra' हें प्रकरण, PP. 123-170.

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अशी परंपरा होती असें नाभाजी सांगतो.[२८] बंगालमधल्या वल्लभसंप्रदायांतहि विष्णुस्वामीच्या शिष्यपरंपरेची अशीच आख्यायिका प्रचलित आहे.

गीता, भागवत व विष्णुपुराण यांवर टीका लिहिणारे श्रीधरस्वामी हेहि विष्णुसंप्रदायी होते असे बंगालमधील कांही वैष्णव मानतात.[२९] श्रीधराने आपल्या भागवतटीकेंत ' तदुक्तम् विष्णुस्वामिना ' असें म्हणून[३०] विष्णुस्वामीचा व त्याच्या तीन श्लोकांचा उल्लेख केला असल्यामुळे व आपल्या 'विष्णुपुराणटीकें'त ' तदुक्तम् सर्वज्ञसूक्तौ ' असें म्हणून त्यांपैकी एक श्लोक उद्धृत केल्यामुळे[३१] श्रीधर हा विष्णुस्वामीचा शिष्य होता या बंगालमधील वैष्णवांच्या आख्यायिकेला विशेष रंग चढला आहे.

या आख्यायिकेनुसार श्रीधर हा विष्णुस्वामीनंतरचा ठरतो. विष्णुस्वामीचा काळ तेरावें शतक हा डॉ. भांडारकरांनी नमूद केला आहे.[३२]

विष्णुस्वामीच्या शिष्यसंप्रदायांत नाभाजीने ज्ञानदेव, वल्लभ इत्यादिकांचा जसा उल्लेख केला आहे, तसा श्रीधराचा केला नाही. विष्णुस्वामी ते वल्लभ या कालखंडांत जर श्रीधर झाला असता तर विष्णुस्वामीच्या शिष्यसंप्रदायांत नाभाजीने, किंवा पुढे प्रियादासाने[३३] तरी, त्याचा उल्लेख खचित केला असता. वल्लभाचा जन्मकाळ इ. स. १४७९ हा[३४] आहे. अर्थात्, ' भक्तमाला'च्या माहितीनुसार, श्रीधराचा काळ इ. स. १४७९ नंतरचा मानला पाहिजे. कमींत कमी ज्ञानदेवाच्या [ इ. स. १२९० ] पूर्वी तरी तो झाला असणें असंभवनीय नाही.

वरील सर्व विवेचनावरून इ. स. १४२५ हा श्रीधराच्या कालनिर्णयाचा शेवटला बिंदु मानायला हरकत नाही. इ. स. १३०० ते १४२५ या दोन सीमेंत श्रीधराचा काल निश्चित केला पाहिजे.

## ' नरींद्रा ' चा प्रतिभा-विलास

नरींद्राने शके १२१४ त [ इ. स. १२९२ ] ' रुक्मिणीस्वयंवर ' पूर्ण केलें. श्रीधराचा काळ त्यानंतरचा आहे. अर्थात्, ' रुक्मिणी-पत्रिके ' चें जनकत्व श्रीधराचें नाही. नरींद्राच्या पूर्वी लिहिण्यांत आलेल्या रुक्मिणीस्वयंवराच्या एकाहि कथेंत पत्रिकेचा उल्लेख नाही. रुक्मिणीने श्रीकृष्णाला लिखित पाठविलें असें ' भागवत ', ' हरिवंश ', ' पद्मपुराण ' व 'विष्णुपुराण' या रुक्मिणी-स्वयंवराची कथा नमूद करणाऱ्या पुराणग्रंथांत कुठेहि म्हटलेलें नसतांना, नरींद्राने मात्र रुक्मिणीचें भावलिखित निर्माण करावें यांत त्याच्या भावसंकुल व कलाचतुर प्रतिभेचा विलासच व्यक्त होतो. ● ● ●

२८. ' भक्तमाल ' [ नाभाजी ] Edi. by Kemraj ( Bombay, शके १८२१ ) PP. 95-98.
२९. Amarnath Ray : 'The Vishnusvamin Riddle':Annals B. O. R. Institute, Vol. XIV. (P. 164).
३०. भागवतटीका, १-७-६; ३-१२-१२.
३१. विष्णुपुराणटीका, १-१२-७०.
३२. Vaiṣ. Sai. &c. [Collected Works IV, P. 110].
३३. नाभाजी व प्रियादास यांसंबंधी प्रा. भ. श्री. पंडित यांचा लेख पाहा. [ म. सा. पत्रिका, वर्ष १५, अंक ४, ऑक्टो. १९४२ ].
३४. Dr. Bhandarkar, P. 109. Farquhar, P. 312.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

शं. गो. तुळपुळे

# पुनश्च पंढरपूर - शिलालेख

म. सा. पत्रिकेच्या एप्रिल-जून १९५६ च्या अंकांत प्रसिद्ध झालेल्या "पंढरपूर-विठ्ठलमंदिराच्या इतिहासांतील एक अज्ञात दुवा" या माझ्या लेखाची आस्थापूर्वक दखल घेऊन त्यांत मीं संपादित केलेल्या पंढरपूर येथील शके १११० च्या शिलालेखाविषयी चर्चात्मक लेख लिहून मार्गदर्शन केल्याबद्दल महामहोपाध्याय श्री. मिराशी यांचा मी फार आभारी आहे. म. मिराशी यांचा हा लेख म. सा पत्रिकेच्या गेल्या अंकांत आलेला असून त्यांत त्यांच्या दृष्टीने मतभेदाचीं अशीं दोन स्थळें दिसतात. पैकी शिलालेखाच्या दुसऱ्या ओळींतील 'सालवण' या शब्दाचें वाचन हें एक होय. हा शब्द म. मिराशी 'सालाहण' असा वाचतात व या वाचनास आधार प्राकृत ग्रंथांतून देतात. माझें या शब्दाचें वाचन 'सालवण' असें असून हें रूप प्राचीन लेखांतून कोठे आढळत नाही हें म. मिराशी यांचें म्हणणें बरोबर आहे. परंतु इतर लेखांतून तें आढळत नाही म्हणून प्रस्तुत लेखांतहि तें नसावें हें त्यांचें म्हणणें मात्र युक्तिवादास सोडून वाटतें. कारण शालिवाहन या संस्कृत शब्दाचा अपभ्रंश जसा 'सालाहण' असा होईल, त्याप्रमाणे 'सालवण' असाहि होऊं शकेल. सालिवण (< सं. शालिवन) असा एक शब्द कांही प्राचीन मराठी लेखांत येतो (उदा., आंबें १-६; तेर १-६). या शब्दाची व्युत्पत्ति निराळी असून त्याचा अर्थहि निराळा म्हणजे भातशेत किंवा भातखाचर असा आहे. परंतु ध्वनिप्रक्रिये (Phonology) च्या दृष्टीने विचार करतां

१. सं. शालिवन > म. सालिवण

२. सं. शालिवाहन > म. सालवण

या दोन व्युत्पत्तींमध्ये नियमसाम्य दिसतें. ठसा अस्पष्ट असल्याने 'सालवण' व 'सालाहण' अशीं दोन्ही वाचनें संभवतात. मूळ शिलालेख पाहतांहि हीं दोन्ही वाचनें शक्य वाटतात. अशा परिस्थितींत या शब्दाच्या वरील दोन वाचनांपैकी अमुक एक बरोबर असें सध्या तरी निश्चयाने म्हणतां येत नाही. असो; 'संवत्सरनामानंतर मास, पक्ष व तिथि यांचा उल्लेख अपेक्षित आहे' असें म. मिराशी म्हणतात तें युक्तच आहे; परंतु मूळ लेखांतच हा कालविषयक तपशील दिलेला नसल्याने त्यास कोणाचाहि इलाज नाही. म. मिराशी यांचा दुसरा मतभेद शके ४३८ मधील ताम्रपटाच्या आधारें सूचित होणाऱ्या पंढरपुरांतील विठ्ठल-भक्तीच्या प्राचीनत्वाविषयी आहे. परंतु या विषयाचा प्रस्तुत शिलालेखाशीं विशेष संबंध नसल्याने येथे त्याची चर्चा करण्याचें कारण नाही.

म. मिराशी यांच्या लेखांत न दाखविलेला असा एक दोष माझ्या प्रथम संपादनांत राहून गेला आहे त्याचेंहि निरसन येथेच करतों. या शिलालेखाचें वाचन मीं स्वतः घेतलेल्या ठशांवरून केलेलें होतें, व लेखाचे ठसे घेणें आणि त्याचें संपादन करणें या दोन कामांत सुमारें तीन वर्षांचें अंतर पडल्याने मूळ शिलालेखाविषयीची माझी स्मृति कांहींशी अस्पष्ट होऊन गेली होती. माझ्यासमोर मूळ शिलालेख नव्हता, तर त्याचे ठसे होते व तेहि अस्पष्ट होते. अर्थात् यास इलाज नव्हता. ठसे घेतांना एक कागद न पुरल्याने लेखाचे दोन भाग करून त्याचे दोन निरनिराळे ठसे घ्यावे लागले होते. याशिवाय शिळेच्या दुसऱ्या बाजूवरहि कांही मजकूर खोदलेला होता त्याची नोंद मनाने करून ठेवली होती. या मजकुराचा ठसा मात्र घेतलेला नव्हता; कारण ` उघडउघड उत्तर-

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

कालीन असून त्याचा मूळ शिलालेखाशीं कोणत्याहि प्रकारें संबंध दिसत नव्हता. यामुळे झालें असें : लेखाचें प्रत्यक्ष संपादन करीत असतांना समोर असलेले त्याचे दोन भागांत घेतलेले दोन ठसे आणि शिळेच्या दुसऱ्या बाजूवरहि कांही मजकूर खोदलेला आहे ही अस्पष्ट आठवण अशा दोन गोष्टींची मनांत गल्लत होऊन मूळ शिलालेखच शिळेच्या दोन बाजूंवर खोदलेला आहे असा ( गैर-) समज होऊन त्याप्रमाणे त्याचें वर्णनहि मजकडून दिलें गेलें. म. मिराशी यांचा लेख प्रसिद्ध झाल्यानंतर पंढरपुरास जाऊन मूळ शिलालेख पुनः पाहतां त्याचें मीं केलेलें वर्णन बरोबर नाही असें माझ्या लक्षांत आलें. हा लेख ' शिळेच्या दोन बाजूंवर खोदलेला ' असून त्याच्या ' ओळी एका बाजूवर १० व दुसऱ्या बाजूवर ८ याप्रमाणे एकूण १८ आहेत ' असें मीं म्हटलें होतें ( पृ० ३० ). लेखाचें हें वर्णन बरोबर नाही. कारण लेखाची शिळा पाहतां तो संपूर्णतः एकाच बाजूवर खोदलेला दिसतो. त्याच्या ओळी एकूण १८ च आहेत, परंतु त्या सर्व शिळेच्या एकाच बाजूवर खोदलेल्या आहेत, दोन बाजूंवर मिळून नाहीत. अर्थात् माझ्या प्रथम संपादनास जोडलेल्या शिलालेखाच्या ठशाचे दोन भाग बरोबर असले तरी ते सलग आहेत, दोन बाजूंवरील नव्हत, हें आता स्पष्ट आहे. याचा अर्थ शिळेची दुसरी बाजू कोरी आहे असा मात्र नव्हे. या बाजूवरहि एक लेख खोदलेला आहे; परंतु तो उत्तरकालीन असून त्याचा प्रस्तुत शिलालेखाशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध असल्याचें दिसत नाही. असो; झाल्या चुकीबद्दल खेद व्यक्त करणें हें मी आपलें कर्तव्य समजतों.

प्रत्यक्ष शिलालेख पाहतां माझ्या प्रथम वाचनांत कांही ठिकाणीं दुरुस्ती सुचवावी असेंहि मला वाटलें. अशीं स्थळें पुढे देत आहे :—

| ओळ | प्रथम वाचन | संभवनीय दुरुस्ती |
|---|---|---|
| १०. | वाढसि [ वि ] जें जाती वी– | वाढसिजें भावा वी- |
| १३. | ............संप्रति | ............नायकि |
| १७. | विधात्रुद्रोहि.......... | परांत्रद्रोहि.......... |
| १८. | ...............कर्मठु | ...........कर्मका [ रि ] |

असो; म. मिराशी यांच्या उपर्युक्त लेखामुळे मूळ शिलालेख पुनः पाहण्याची आवश्यकता निर्माण होऊन त्यांतून वरील महत्त्वाची दुरुस्ती करणें शक्य झालें याबद्दल त्यांचे पुनः आभार मानून हें टिपण पुरें करतों. ● ● ●

संमेलन प्रसंगीं रंगणाऱ्या
श्री. मो. ग. रांगणेकर यांच्या नाटिका
* कारकुनाचें स्वप्न * मी किंवा तूं
* तुझं माझं जमेना * सतरा वर्षं
* फरारी
किंमत प्रत्येकीं बारा आणे
रामकृष्ण बुक डेपो, मुंबई ४



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# पत्रव्यवहार

'घनाक्षरी,' 'रुक्मिणी–पत्रिका', 'लापणिका' यांविषयी

स. न. वि. वि.

'पत्रिके'च्या गेल्या दोन-तीन अंकांत वरील विषयांसंबंधी लेख व पत्रव्यवहार आलेला आहे. त्यासंबंधांत सुचलेले विचार ( एकांत माझा प्रत्यक्ष संबंध असल्यामुळेहि ) पुढे देत आहें.

( १ ) घनाक्षरी

"समोच्चारित छंद" नांवाचा श्री. चैतन्य देसाई यांचा लेख गेल्या 'पत्रिकें'त (जुलै ते सप्टें. १९५६) आला आहे. जवळजवळ यासारखेंच विवेचन माझ्या "मराठी छंदोरचना" पुस्तकांत आलेलें आहे. एक मतभेद आहे. सर्व अक्षरें सारखीं, म्हणजे त्यांचा कालिक भार सारखा, हें खरें असलें तरी जेव्हा उच्चारण 'नॉर्मल्' किंवा सर्वसाधारण पद्धतीने होत असतें तेव्हा यांतील अक्षरें केवळ समकालभाराचींच नव्हेत, तर द्विमात्रिक कालभाराचीं असतात. त्याच गर्तीत 'विद्युन्माले'चें उच्चारण स्वाभाविक होतें व तें दरअक्षरीं गुरु म्हणजे द्विमात्रिक कालभाराचें असतें. अभंगात्मक समोच्चारी छंदाची तुलना मी तेथे विद्युन्माला या सर्व-दीर्घाक्षरी वृत्तांतील उच्चारणाशीं करून, तीच गोष्ट घनाक्षरीच्याहि बाबतींत लागू असल्याचें नमूद केलें आहे ("मराठी छंदोरचना" पृ. १३८, १४०). त्याशिवाय क्वचित् अपवादात्मक स्थळीं एका समोच्चारी ( द्विमात्रिक ) अक्षराच्या जागीं दोन अक्षरें एकमात्रिक कालभाराचीं ( लघु ) येतात. त्यामुळेहि समोच्चारित छंदाक्षर हें दोन एकमात्रिकाएवढें म्हणजेच द्विमात्रिक किंवा तीव्रप्रयत्न असतें, हें दिसून येतें. अर्थातच, सर्व समोच्चारितांचें उच्चारण किंवा म्हणणी जलद, अर्ध्या कालमानाची, असेल तेव्हा सर्वच अक्षरें समोच्चारित राहूनहि लघुप्रयास बनतील हें उघड आहे. ही गोष्टहि मीं तेथेच नमूद केलेली आहे. ("मराठी छंदोरचना" पृ. १४४, ४६ ).

'घनाक्षरी'चें मराठी स्वरूप आणि गुजरातींतील रूढ 'मनहर' छंद हीं दोन्ही सारखींच आहेत. कै. प्रो. रामनारायण पाठक यांनी ही गोष्ट आपल्या "प्राचीन गुजराती छंदो" मध्ये नमूद केलेली आहे व तिचाहि उल्लेख माझ्या पुस्तकांत आलेला आहे. कै. पाठकसाहेब, या 'संख्यामेळ' छांदस रचना ('कवित्त' नामक) हिंदी प्रकारावरून रूढ झाल्या असें मानतात ("प्राचीन गुजराती छंदो" पृ. १९३–१९५). कै. राजवाडे यांनी रामदयाळूच्या 'वृत्तचंद्रिके'वरून घनाक्षरी ही ३१ अक्षरांची असते हें दाखविलें आहे व तेथेच ती क्वचित् ३२ अक्षरांची असते असेंहि नमूद केलें आहे. ( कै. प्रो. पाठक यांनी हें सर्व अवतरण, आपल्या "बृहत् पिंगळ" या श्रेष्ठ छंदःशास्त्रीय ग्रंथांत दिलेलें आहे. पृ. ५६७ ).

खरें असें दिसतें की, ही 'मनहर'–'घनाक्षरी'ची पद्धत हिंदीवरून इकडे आलेली असावी. चिंतामणि कवीने घनाक्षरीचें लक्षण ३१ अक्षरांचें दिलेलें आहे. कै. वामन दाजी ओक यांनी यासंबंधीचें अवतरण वामन पंडिताच्या घनाक्षरीच्या संदर्भात दिलेलें असून तेथेच



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

याला ' कवित्त ' असेंहि म्हणतात अशी पुस्ती जोडली आहे ( पाहा, 'मराठी छंदोरचना,' पृ. १२३). आचार्य शांतिलाल ' बालेन्दु ' यांच्या ' हिंदी काव्यवाङ्मयां'तील ' पिंगलप्रकाश '-प्रकरणांत तर ' मनहरण '' हा मराठी घनाक्षरीशीं जुळता छंदहि दिलेला आहे. ( पाहा– ' हिंदीकाव्यशास्त्र, ' पृ. २७९ ). यावरून ' मनहर ' हा छंदहि केवळ गुजराती नव्हेच; तो हिंदीवरूनच आलेला आहे, हेंहि दिसून येतें. तो छंद समोच्चारित स्वरूपांत मराठींतून तिकडे गेला हें श्री. चैतन्य देसाई यांचें मत ग्राह्य ठरत नाही तें यामुळेच. ' मनहरण ' छंद ३१ अक्षरांचा, ' रूपघनाक्षरी ' छंद ३२ अक्षरांचा, ' देवघनाक्षरी ' छंद ३३ अक्षरांचा व ' जनहरण ' हा छंद ३० वर्ण व अंतीं १ गुरु ( नियत ) असा 'मनहरण'सारखाच, असे सर्व छंद एका गटांतील ' मुक्तकसम ' म्हणून श्री. बालेंदूंनी दिले आहेत.

मोरोपंतांनी ' घनाक्षर रामायणां 'त वापरलेली घनाक्षरी ३१ अक्षरांचीच आहे व तेथेंच ' घनाक्षर ' हें छंदोनामहि एका घनाक्षरींत ओवलेलें आहे (' मराठी छंदोरचनेचा विकास ' ह्या माझ्या अप्रकाशित ग्रंथांत मीं हें सविस्तर नमूद केलेलें असून, त्याचा उल्लेख ' मराठी छंदोरचने ' मध्येहि आलेला आहे. पृ. १२४ ).

श्री. चैतन्य देसाई यांच्या वाचनांत माझें पुस्तक दुर्दैवाने आलेलें नसावें त्यामुळे त्यांना हा सर्व उलगडा होऊं शकला नाही, हें उघडच आहे.

## ( २ ) रुक्मिणी–पत्रिका

रुक्मिणी-स्वयंवरासंबंधीच्या जुन्या ग्रंथांत रुक्मिणीने पत्रिका लिहिल्याचे उल्लेख आढळतात, हें श्री. य. ग. फफे यांनी दाखवून दिलेंच आहे (' म. सा. प. ' जुलै-सप्टें. ५६ ). '' मराठी छंदोरचनेचा विकास '' लिहितांना मलाहि याचा शोध घ्यावा लागला. मोरोपंतांनी केलेला पुढील उल्लेख यासाठी फार सूचक ठरला :

> स्वकरें ' वसंततिलका ' वृत्तें पत्रांत सात मोजूनि ।
> लिहिलीं होतीं तींही लिहितां-लिहितां क्षणांत योजूनि ॥

मोरोपंत, ' कृष्णविजय '.

आपल्याकडे रूढ असलेल्या ' भागवत ' प्रतींत लिहिण्यासंबंधाचा प्रत्यक्ष उल्लेख नसला तरी '' श्रुत्वा गुणान् भुवनसुंदर शृण्वतां ते '' इत्यादि सात श्लोक हीच रुक्मिणीची पत्रिका असा जुन्या कवींचा समज होता. '' श्रुत्वा गुणान् '' इ. श्लोकाचें वृत्त वसंततिलका आहे व तें मोरोपंतानी स्पष्ट लिहिलेंच आहे. एकंदरीने श्री. फफे यांनी निदर्शित केलेलें मतच सत्य मानावें लागतें. अध्यापनाच्या अनुषंगाने नरेंद्राच्या यासंबंधीच्या नावीन्याचा स्वीकार करावा किंवा नाही याची चर्चा करतांना, वरीलप्रमाणे मत मींहि व्यक्त केलें होतें.

नरेंद्राच्या काळीं, पूर्वसूरींच्या ग्रंथांची ' वाट पुसत ' आपण जातों, या गोष्टीचा कवींना अभिमान वाटत असे. भगवान् व्यासांनी न सांगितलेली एखादी गोष्ट आपण नव्यानेच रचून सांगणें हें कृत्य, त्या काळच्या समजुतीप्रमाणे, धृष्टपणाचें मानलें जावें असें आहे. नरेंद्राने स्वतःच नम्रपणाने सांगून टाकलें की,

> भागवतापासौनि पद्मपुराणीं । जें सैंवर बोलिजे रुक्मिणी ।
> तेथ देवातें कींनरू वाखाणी । तें सांधैल नरेंद्र ॥ ७५ ॥

' समग्र ' रुक्मिणीस्वयंवराचाच आधार हीं दोन पुराणें आहेत. म्हणून नरेंद्राने 'पत्रिका'-हि पूर्वींच्या ग्रंथांतल्याप्रमाणेच रुक्मिणीच्या हातची म्हणून उल्लेखिली हें स्वाभाविकच आहे. भागवताची कोणती तरी वेगळी प्रत त्या काळीं रूढ असावी व त्यांतलाच श्लोक



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

श्रीधराचार्यांनी उद्‌धृत केलेला असावा, हें श्री. फफे यांनी नमूद केलेलें स्पष्टीकरण यासाठीच ग्राह्य ठरतें. प्रो. डोळके हे याचें श्रेय नरींद्राला देऊं पाहतात ('म. सा. प.' एप्रिल ते जून, १९५६) पण तें सयुक्तिक वाटत नाही.

( ३ ) 'लापणिका'

'पत्रिके'च्या (जाने.–मार्च १९५६) अंकांत प्रो. धोंड यांनी 'लापणिके'विषयी छोटा लेख लिहिला आहे, त्यांत माझ्या एतद्‌विषयक मताचा उल्लेख केलेला आहे. तुकारामाच्या अभंगांतील 'लापणिक' शब्दाचा 'सलगीचें बोलणें' असा अर्थ मीं संदर्भावरून ठरविला होता. विद्वानांस तो अग्राह्य वाटत असल्यास माझा आग्रह नाही. (तुकारामाचे 'सलगीचे अभंग' प्रसिद्धच आहेत.)

त्यांचा मुख्य मुद्दा हा आहे की, 'लापणिका' हा शब्द जुन्या प्राकृत भाषांत 'छंद', 'पद्य' या अर्थी गवसत नाही, म्हणून तो देश्य शब्द असावा; मागाहून त्याचें संस्कृतीकरण केलें गेलें असावें.

जैन प्राकृतांत 'उल्लावण' अशा तऱ्हेचा एक शब्द आलेला असून त्याचें 'उल्लापन' हें रूढ संस्कृत रूपहि नमूद केलेलें आढळलें आहे (यासंबंधीचें सविस्तर टिपण अन्यत्र प्रसिद्ध होत आहे). जैन 'आगम' ग्रंथांपैकी 'सूयगड' या अत्यंत प्रसिद्ध ग्रंथांत ('सूचकस्कंध' १, 'अजझवण' ४, 'उद्देस' २ या संदर्भात) स्त्रीलंपट पुरुषाला भोगाव्या लागणाऱ्या यातना वर्णन करतांना, रात्रीं अचानक जागा होऊन रडणाऱ्या बालकाला दाईप्रमाणे समजावून गप्प करण्याचें धात्रीकार्यहि त्याला करावें लागतें, असा उल्लेख आहे व संस्कृत टीकाकार आचार्य शीलांकसूरि यांनी त्याचें स्पष्टीकरण करतांना 'अनेकप्रकारैः उल्लापनैः' असें म्हटलें आहे. हाच तो 'उल्लापना'चा प्राचीन उल्लेख. ही टीका संस्कृत टीकांमध्ये प्राचीनतम असून तिचा काळ इसवी सनाचें नववें शतक हा आहे. संदर्भावरून 'उल्लापन' म्हणजे बालकांना समजावण्याचे गीतादि प्रकार, असा अर्थ त्या आचार्यांनीच केलेला असून, तसल्या गीतात्मक 'उल्लापना'चें उदाहरण म्हणून एक प्राकृतांतील पद्यहि तेथेच उद्‌धृत केलेलें आहे. यावरून 'लापन–लावण' हा शब्द, उपसर्गयुक्त का होईना, गीतार्थाने प्राचीन काळीं रूढ होता असें निश्चित मानावें लागतें. अधिक शोधान्तीं कदाचित् 'लावणी'चाहि पत्ता लागेल, असें आता अधिकच वाटूं लागतें [प्रो. हिरालाल कापडिया यांच्या "हजार वर्षपरनुं हालरडुं"–अंगाईगीत नांवाच्या, 'अखंड आनंद', (डिसें. १९५६) च्या अंकांतील लेखावरून हे उल्लेख येथे दिले आहेत.] ● ● ●

आपला, ना. ग. जोशी

मराठवाडा साहित्य परिषदेचें मासिक

**प्रतिष्ठान**

संपादकीय कार्यालय

मराठी ग्रंथ संग्रहालय, इसामिया बाजार, हैद्राबाद (द.)

वा. वर्गणी रुपये किरकोळ अंक ८ आणे.



अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

# साहित्य-समीक्षा

**' शाहीर हैबती '** ( चरित्र आणि काव्य )

' शाहीर हैबती ' असें म्हटल्यानंतर पेशवाईतील प्रभाकरी फडाचा वस्ताद जो सुप्रसिद्ध ' गंगू हैबती शाहीर ' तोच हा की काय, असा सुरुवातीसच मोठा घोटाळा होण्याचा संभव आहे. म्हणून असा खुलासा केला पाहिजे की, प्रस्तुत पुस्तकांतील लावण्यांचा कर्ता हा सध्या सुपरिचित असलेल्या पेशवाईतील शाहीर मंडळींच्या गोत्रांतला नसून तो रामदासांनी वर्णन केलेल्या ' धीट, पाठ ' कविवर्गापैकी, म्हणजे अध्यात्माची वडबड करणारा, भेदिक ' इद्वान् ' लावणीकार आहे. भेद याचा अर्थ कांही गूढ किंवा कोडें किंवा रहस्य; आणि तें कोडें किंवा रहस्य उलगडून दाखवणारें जें कवन तें भेदिक कवन. अध्यात्माइतकें कायमचें रहस्यमय असें दुसरें कांहीच नाही ! यामुळे त्या गहन रहस्याची उकल करून दाखविणें हें ' भेदिक ' लावणीकारांचें मुख्य कर्तव्य असें साहजिकच अपेक्षिलें गेलें. पण अपेक्षा ठीक असली तरी अखेर ज्या अडाणी व अर्धशिक्षित अशा शाहीर कवींनी तें काम उचललें त्यांच्याकडून त्यांच्या लायकीइतपतच तें कार्य वठलें गेलें असल्यास त्यांतहि कांहीच आश्चर्य नाही. पुराणांतरीच्या अचाट भाकड गोष्टी घेऊन किंवा त्यांतल्या कांही शाब्दिक श्लेषांचा आधार घेऊन, नाहीतर त्यांच्या अनुरोधाने स्वतःच कांहीतरी आचरट कोड्या लढवून, प्रतिपक्षी फडांतील शाहिरांना कोडीं घालणें, त्यांना निरुत्तर करणें व नंतर आपण त्या कोड्याचें उत्तर सांगून स्वतःची विद्वत्ता आणि पांडित्य मिरविणें, इतकाच या भेदिक कवनांना अर्थ उरला. ज्या खालच्या थरांतील अडाणी अशिक्षित समाजांत हें सारें चाले त्याच्या दृष्टीने हे ' भेदिक कवि ' त्यांच्यांतले मोठेच ' विद्वान् ', 'पंडित' समजावयाला हरकत नाही. फक्त खऱ्या अभिजात पंडितांशीं किंवा कवींशीं त्यांची तुलना करूं नये म्हणजे झालें ! कारण ती कसोटी लावली असतां या भेदिक कवींचीं कवनें म्हणजे केवळ बालिश किंवा पोरकट उठाठेव ठरते.

वर सांगितलेल्या भेदिक कविवर्गापैकीच प्रस्तुत पुस्तकांतील लावण्यांचा कर्ता समजला जाणारा हैबती शाहीर होय. त्याच्या सुमारें पन्नास लावण्या या संग्रहांत ग्रथित आहेत आणि सुमारें पन्नास पृष्ठें त्याच्या चरित्राने व्यापलीं आहेत. एक तऱ्हेने असें म्हणतां येईल कीं, तीं दोन्ही अगदी एका तोलाचीं आहेत. म्हणजे असें की, प्रत्यक्ष हैबतीच्या कवनांत काव्याचा किंवा खऱ्या विद्वत्तेचा जितका दुष्काळ आहे तितकाच किंवा त्याहूनहि अधिक असा दुष्काळ संपादकांनी दिलेल्या चरित्राच्या सत्यतेविषयी आणि चरित्र-विषयाच्या योग्यता-मापनाविषयी दिसून येतो. फार काय सांगावें असेंहि म्हणतां येईल की, चरित्रकारांनी आपली भोळी, भरमसाट आणि अत्युक्तिरूप प्रस्तावना या कवीच्या लावण्यांना जोडली नसती तर

---

शाहीर हैबती—[ लेखक व संग्राहक–वि. कृ. जोशी, द. वि. परचुरे. संपादक–राजाभाऊ थिटे, ' संपदा प्रकाशन ' ३६० नारायण, पुणें २. एकमेव विक्रेते–व्हीनस बुक–स्टॉल, पुणें २. पृष्ठसंख्या ९८. प्रथमावृत्ति १९५६. किंमत १। रुपया. ]

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

त्या कवीची जितकी माफक अशी वास्तविक योग्यता आहे तितकीच लोक समजले असते. परंतु संपादकांच्या प्रस्तावनेमुळे मात्र त्या कवीचा निष्कारण उपहास किंवा टिंगल होण्याचें संकट ओढवलें आहे ! साहाजिकच आहे की, संपादकांनी निर्माण केलेल्या खोट्या अपेक्षा मनांत धरून वाचक हैबतीच्या कवितांकडे पाहूं लागेल आणि त्या तशा नाहीत, अगदीच सामान्य-सुमार आहेत असें त्याला आढळेल आणि मग अपेक्षाभंगाचें पर्यवसान म्हणून तो त्या बिचाऱ्या कवीचीच टवाळी किंवा टिंगल करूं लागेल ! हें विधान नीट लक्षांत येण्याकरितां संपादकांनी हैबती शाहिराची जी अत्युक्तिरूप स्तुति केली आहे तीच संकलित करून त्यांच्याच शब्दांनी वाचली म्हणजे झालें. ते लिहितात, " हैबतीची बुद्धिमत्ता विराट असून तो त्या काळचा प्रकांडपंडितच होता. तो कलगी सम्राट् होता. जोतिषशास्त्र, गणितशास्त्र, संख्याशास्त्र, शरीरशास्त्र, शिल्पशास्त्र, संगीतशास्त्र, छंदशास्त्र, वनस्पतिशास्त्र, कोकशास्त्र, प्राणिशास्त्र हीं सर्व त्याने अभ्यासिलीं होतीं. ज्ञानेश्वरांच्या तोलाची आणि योग्यतेची कामगिरी हैबतीने शास्त्रज्ञान मराठींत सांगून केली. त्याचा लेखनप्रपंच इतका प्रचंड होता की, त्याने चारपांच लेखक पदरीं ठेवले होते. त्याची लावणीसंख्या असंख्य आहे ! तथापि मोजदादच केली तर त्याची एकंदर कवनसंख्या एक लक्ष साठ हजार आहे. त्याच्या बुद्धीची झेप पाहिली म्हणजे सूर्यबिंबावर उडी घेणाऱ्या हनुमंताचीच आठवण होते. त्याची बुद्धिमत्ता विशाल, कुशाग्र, प्रगल्भ आणि सर्वसंग्राहक अशी होती. तो एक चालताबोलता ज्ञानकोश होता. आजच्या भाषेंत त्याला त्या काळचा ' ब्रेन ट्रस्ट ' म्हणतां येईल. शास्त्रसंमत कवनांचा अजबखाना त्याच्या एक लक्ष साठ हजार कवनांत भरला आहे. "

ही झाली हैबतीच्या बुद्धिमत्तेची आणि काव्यगुणांची संपादककृत प्रशस्ति. पण येवढ्यानेहि भागलें नाही म्हणून " हैबती हा नुसता शब्दवीर नव्हता, कृतिशूर होता. क्रियावान् पंडित आणि परिस्थितीला कलाटणी देऊं शकणारा पुढारी होता " असें स्वतःच्या मनचेंच तर्कट रचून संपादकांनी इतर सर्व शाहिरांपेक्षा ' हैबती ' हा असामान्य असा कर्ता समाजसुधारक होता असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. पेशवेकालीन शाहिरांनी शृंगाराने समाजाची संपूर्ण अवनति केली हें पाहिल्यामुळे हैबतीने शृंगारप्रवण लावणी-वाङ्मयाच्या विरोधाचें निशाण उभारलें आणि तमाशाचें घाणेरडें रूप बदलण्याकरिता त्याने नमुनेदार असा आपला आध्यात्मिक तमाशा सुरू केला, असें संपादक सांगतात.

हें सर्व संपादकांचें मनचेंच कपोलकल्पित तर्कट आहे. त्याला कांहीएक विश्वसनीय पुरावा असा त्यांनी दिलेला नाही. सर्वच चरित्रभर हा सावळागोंधळ दिसतो. आधुनिक न्यायालयांत जो पुराव्याचा कायदा रूढ आहे तोच ऐतिहासिक सत्य पारखून घेतांनाहि तंतोतंत लावला जातो. त्या कसोटीने पाहिलें असतां खुद्द शाहीर हैबतीच्या चरित्राचा संपादकांचा आराखडा अगदीच कमकुवत व विश्वास ठेवण्याला अपात्र असा आहे. तसेंच चरित्रकारांनी हैबतीच्या काल्पनिक कर्तृत्वामागे जी स्वतःच्या कपोल-कल्पित कारणांची किंवा समर्थनाची पार्श्वभूमि निर्माण केलेली आहे तीहि मृगजळासारखी असत्य आहे. म्हणे 'एक लाखाहून अधिक या शाहीर कवीचा लावणीसंग्रह आहे.' असें असतां संपादकांना पांचपन्नासच तेवढ्या लावण्या उपलब्ध व्हाव्यात ? हैबती जर दीर्घकाळपर्यंत सतत लावण्या रचण्याचा पेशा पत्करलेला अतिनामांकित असा कोणी 'वरदी' महाकवि होता तर त्याच्या शेकडोशे लावण्या उपलब्ध होण्यास प्रत्यवाय नव्हता. जुन्या काळीं छपाईची कला उपलब्ध नव्हती अशा वेळीं आवडलेली कविता लोक मिळेल तेथून मिळवून आपल्या बाडांतून लिहून ठेवीत असत. होनाजी किंवा इतर कवींच्या अशा चांगल्या चांगल्या लावण्या, लिहून ठेवलेल्या,



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

इतिहाससंशोधकांना भिन्न भिन्न ठिकाणीं उपलब्ध होतात. मग तसें हैबती शाहिराबद्दल कां आढळूं नये ? काळाच्या चाळणींतून जें उत्कृष्ट असें तेवढेंच अखेर शिल्लक उरत असतें व तेंच परंपरेने पुढील पिढ्यांच्या हातीं जातें. 'अनंत कवनांचा सागर' म्हणून संपादकांनी उद्घोष केलेल्या या शाहिराचीं घागरभर सुद्धा कवनें मिळालेलीं नाहीत यांतच सारा निवाडा खरोखर आहे. बरें आता तीं थोडीशीं कवनें तरी काव्यगुणांनी किंवा विद्वत्तेने किंवा पांडित्याने सरस आहेत म्हणावीं तर तिकडूनहि निराशा. भाडळीचे आडाखे किंवा कोश्या छंदोबद्ध झाल्या म्हणून त्यांना काव्य म्हणावयाचें तर निरनिराळीं वजनमापांचीं कोष्टकें किंवा लेजिम-लाठीच्या कवाइतींचे हात, लक्षांत राहण्याकरिता वृत्तबद्ध करतात, त्यांनाहि काव्य सदरांत घालण्याची पाळी येईल ! गदगच्या डॉ. चाफेकरांनी होमिओपाथिक औषधींचे गुणधर्म निरनिराळ्या चालींच्या पद्यांत रचून अलीकडे पुस्तकरूपाने प्रसिद्ध केलेले पुष्कळांना माहीत असेलच.

असो; एकंदरींत थोडक्यांत साररूपाने पण निर्भीडपणें सांगावयाचा अभिप्राय हा की, इतिहाससंशोधकांनी स्वतःच्या संशोधनाच्या छंदामुळे अगदी सामान्य लायकी असलेलेहि अनेक संत-कवि लोकांना उपलब्ध करून दिलेले आहेत त्याच अशिक्षित थरांतला हा एक 'भेदिक' कवि आहे इतकेंच. संपादकांनी प्रस्तावनेंत जी माहिती दिली आहे, जे तर्क लढविले आहेत, किंवा जीं प्रमेयें काढलीं आहेत तीं विस्ताराने खोडून काढण्यास येथे सवड नाही. सरतेशेवटीं प्रकाशक थिटे यांचें मात्र अभिनंदन केल्याशिवाय राहवत नाही. या भेदिक कवींची विद्वत्ता आणि ज्ञान हीन दर्जाचें, अगदी सामान्य असतें असा सिद्धान्त मीं पूर्वी मांडलेला होता व तो मांडतांना असें म्हटलें होतें की, भेदिक म्हटल्या जाणाऱ्या या अडाणी कवींचा सध्या बेफाट स्तुतिस्तव सुरू आहे; पण त्यांची लायकी जगाला कळण्यास त्यांच्या भेदिक लावण्यांचे पांचदहा नवे संग्रह लोकांपुढे छापून आले म्हणजे झालें ! श्री. थिटे यांच्या उपक्रमामुळे तशी थोडीशी सोय उपलब्ध होत आहे हें फार चांगलें झालें. ● ● ●

य. न. केळकर

## 'मनाची मुशाफरी' व 'आलोक'

लघुनिबंध हा मोठा फसवा वाङ्मयप्रकार आहे. "जीवनाच्या सामान्य अनुभूतींचें असामान्य चित्रण." "हसत-खेळत गप्पा मारीत केलेलें तत्त्वचिंतन." "लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाचा हृद्य आविष्कार करणारें कथन." अशा लघुनिबंधाच्या विविध व्याख्या आपल्या परिचयाच्या आहेत. या व्याख्या करणाऱ्या टीकाकारांनी हा वाङ्मयप्रकार अगदी सोपा आहे असा गैरसमज प्रसृत करून ठेवला आहे. त्यामुळे सामान्याहून थोड्याशा निराळ्या असणाऱ्या व आपल्या वैशिष्ट्याची जाणीव असणाऱ्या लेखकांना हा वाङ्मयप्रकार हाताळावासा वाटतो. त्यांचे लघुनिबंध वाचणारा १५ ते २० वर्षांपर्यंतच्या अपरिपक्व बुद्धीच्या विद्यार्थि-विद्यार्थिनींचा एक वर्गहि असतो. या अननुभवी मुला-मुलींना आकर्षण वाटावें इतकें वैशिष्ट्य-पूर्ण व्यक्तिमत्त्व या निबंधांतून व्यक्त होतें. परंतु जीवनाचा अधिक अनुभव असलेल्या व्यक्तींना मात्र लेखकाची झेप कोठपर्यंत आहे हें समजल्यावर या लघुनिबंधांत फारसा रस वाटत नाही.

[मनाची मुशाफरी—ले. म. ना. अदवंत, चित्रशाळा प्रेस, पुणें २. किं. २।। रु.
आलोक—ले. भगवन्त देशमुख, ध्रुव प्रकाशन, गौळीगुडा, हैद्राबाद. किं. २ रु.]

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

श्री. म. ना. अदवंत यांच्या 'मनाच्या मुशाफरी'ला प्रस्तावना लिहितांना श्री. खांडेकर यांनी अदवंतांच्या व्यक्तिमत्त्वाचें मोठ्या खुबिदारपणाने 'सांप्रदशीतल' असें वर्णन केलें आहे. यामध्ये वाचकाने उत्कट भावनेची अगर प्रखर विचारांची अपेक्षा श्री. अदवंतांच्या लघुनिबंधांत करूं नये हें सूचकतेने सांगितलें आहे; आणि या संग्रहांत हीच मोठी उणीव आहे. हे लघुनिबंध वाचल्यावर श्री. अदवंतांना व्यावहारिकतेचा तिटकारा आहे; खोटें नाणें ते चालवीत नाहीत; ते भिडस्त आहेत; त्यांना राग आला असला तरी सौजन्याचा मुखवटा चढवावा लागतो; त्यांना स्वतःच्या मर्यादांची जाणीव आहे—इत्यादि गोष्टी वाचकाला समजतात. श्री. अदवंतांची भाषा ओघवती आहे व तिला कृत्रिमतेचा स्पर्श होत नाही. विशिष्ट वयांतील वाचकवर्गाला त्यांचा खेळकरपणा व मनमोकळेपणा सुखद वाटेल. पण या मर्यादित कसोट्या लावणें योग्य होणार नाही. श्री. अदवंत वाचकाला अस्वस्थ करतात का? त्याच्या विचारांना धक्का देतात का? त्याला जीवनाच्या अपरिचित पैलूंचें दर्शन घडवितात का? या प्रश्नांना नकारार्थी उत्तर द्यावें लागेल.

श्री. भगवन्त देशमुख यांच्या 'आलोक' या लघुनिबंध-संग्रहांत आविष्कृत झालेलें त्यांचें व्यक्तिमत्त्व अधिक चिंतनशील वाटतें. 'कुठे तरी चुकतंय' व 'आंधळा तूं नाहीस!' अशांसारख्या निबंधांत लेखकाच्या मनाच्या क्षितिजाची व्यापकता दिसून येते. परंतु 'तयार कपडे', 'उपेक्षित वक्के', 'कशावरहि बोलावें' यांसारख्या निबंधांत वर उल्लेखिलेल्या श्री. अदवंतांच्या निबंधांतीलच उणिवा जाणवतात.

श्री. अदवंत व श्री. देशमुख हे दोनहि लेखक व्यासंगी आहेत व बहुश्रुत असल्यामुळे अभिजात वाङ्मयाचे समर्पक उल्लेख, कांही अनुभवांचें चटकदार वर्णन हे गुण त्यांच्या लघुनिबंधांत आढळून येतात. परंतु या वाङ्मयप्रकारांतील अत्युच्च मानदंडाचा वापर केला असतांहि त्यांचे लघुनिबंध श्रेष्ठ वाटले पाहिजेत ही माझी त्यांच्याबाबत अपेक्षा आहे. ●●●

ग. प्र. प्रधान

## 'निंबोणीच्या झाडामागे'

मराठी लघुनिबंधाची परंपरा उणीपुरी वीस-पंचवीस वर्षांची. तशांतहि फडके-खांडेकर-काणेकर यांनी प्रथमतः आखून दिलेल्या सीमारेषा या नव्या वाङ्मयप्रकाराने आजवर ओलांडल्या नाहीतच असें म्हटलें तरी चालेल. तसें पाहावयास गेल्यास या वाङ्मयप्रकाराला कथा-काव्यासारखें भरघोस असें स्वरूप कधीच प्राप्त झालें नाही. असें असलें तरी दिवाकरांबरोबर त्यांची नाट्यछटाहि जशी कालाच्या उदरांत गडप झाली, तसें याचें झालें नाही. अगदी तुरळक स्वरूपांत का होईना पण या वाङ्मयप्रकाराचें लेखन सुरू राहिलें. बोरकर-दोडके यांच्यासारख्या लेखकांनी आपल्या परीने त्याला वेगळें स्वरूप देण्याचा प्रयत्न केला. पण उपर्युक्त निबंधकारांनी आखून दिलेल्या लक्ष्मणरेषेपलीकडे त्याने पाऊल टाकलें नाही. या रेषेपलीकडे पाऊल टाकण्याचें सामर्थ्य आपल्यांत आहे अन् तसें केल्यानेच आपली कांही प्रगति झाली तर होणार आहे या गोष्टीची जाणीवहि त्याला झाली होती असें दिसत नाही. याचें एक कारण असें असण्याचा संभव आहे की, ज्या इंग्रजी Personal Essay पासून

निंबोणीच्या झाडामागे—[ लेखक : मंगेश पाडगांवकर. प्रकाशक : कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें. पृष्ठें १३२. मूल्य २॥ रुपये. ]



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

मराठी लघुनिबंधाने स्फूर्ति घेतली होती त्या इंग्रजी वाङ्मयप्रकारांतच फारशी वाढ झाली नाही. (अन् आज तर औषधापुरतेंहि लघुनिबंधांचें लेखन इंग्रजींत होईनासें झालें आहे! प्रिस्टले एखादाच). कांही का असेना, फडके-खांडेकर-काणेकरांच्यापलीकडे मराठी लघुनिबंध आजवर गेला नव्हता ही गोष्ट मात्र खरी. एखादी लोकविलक्षण वाटणारी कल्पना किंवा विचार घ्यावयाचा अन् त्याच्याचभोवती शब्दांचें जाळें विणीत फेर धरायचा ही आजवरची परंपरा होती. पण गेल्या दोन-तीन वर्षांत पाडगावकर-विंदा करंदीकर (नव्हे, गो. वि. करंदीकर!) प्रभृति लेखक ज्या प्रकारचें लघुनिबंधलेखन करीत आहेत, त्यावरून पाहतां आपल्या पूर्वीच्या कक्षेबाहेर कांही पावलें तरी याने टाकलीं आहेत असें वाटल्याशिवाय राहत नाही. लघुनिबंधाच्या विकासाच्या दृष्टीने ही परिस्थिति स्वागतार्ह अशीच आहे.

श्री. बोरकरांचेंहि कांही नवे लघुनिबंध या दृष्टीने महत्त्वाचे आहेत. लघुनिबंधाच्या विकासाच्या अंतिम मर्यादा कोणत्या असतील याची आजच खूणगाठ बांधणें अशक्य आहे. तशांत मराठींतील नवकथेने लघुनिबंध आणि लघुकथा यांच्यांतील सीमारेषा, जवळजवळ दिसणार नाही इतकी अस्पष्ट करून टाकलेली असल्यामुळे, मराठी लघुनिबंध यानंतर कितपत प्रगति करूं शकेल याचाहि होरा बांधणें आज कठीण आहे. असें असूनहि पाडगांवकर-करंदीकर–बोरकर आणि दोडके यांच्या निबंधलेखनांत, हा वाङ्मयप्रकार आहे इथवरच थांबणार नाही याचीं प्रसादचिन्हें दिसताहेत हें कांही थोडें नाही.

१९५१–१९५२ सालच्या सुमारास 'साधना' साप्ताहिकाच्या निमित्ताने लघुनिबंध-लेखनास श्री. पाडगांवकरांनी प्रारंभ केला. तेव्हापासून ते १ नोव्हेंबर १९५५ पर्यंत लिहिलेले २० निवडक निबंध त्यांच्या प्रस्तुत संग्रहांत संकलित करण्यांत आले आहेत. या संग्रहावरून वरवर नजर फिरविली तरी निम्म्याहून अधिक निबंधांचें लेखन होईपर्यंत ते आपल्या पूर्वसूरींच्या कक्षेंतच फिरत राहिले होते ही गोष्ट जाणवल्याशिवाय राहत नाही. एखाद्या तात्त्विक कल्पनेच्या ठराविक साच्यांतून काढलेल्या गोळ्या, ठराविक पद्धतीनेच ठराविक शैलीच्या साखरेंत घोळून वाचकाच्या गळीं उतरविण्याचें काम ते करीत होते असें दिसतें. 'निंबोणीच्या झाडामागे', 'हवापाण्याच्या गोष्टी', 'तीन माकडें', 'आरामखुर्ची', 'शंख आणि शिंपले', 'वॉशिंग्टनची कुऱ्हाड' इत्यादि त्यांचे प्रारंभीचे लघुनिबंध माझ्या या विधानाची साक्ष देतील. 'धूसर' हा १९५३ सालीं लिहिलेला त्यांचा निबंध मात्र एकदम नवें वळण घेऊन आलेला वाटतो. माघांतल्या एका संध्याकाळचें नुसतें एक 'स्केच'च त्यांनी काढलें आहे. कसला विचार नाही. तत्त्वज्ञान नाही. बाभळीच्या अंगावरचे फुलांचे झुले कुठे हरवले आहेत याचा मागोवा ते घेताहेत. समोरच्या डोंगराची तीच उदास तंद्री त्यांच्या शब्दांतून ओसंडते आहे. पण तेवढ्यांत कांहीतरी जगावेगळं घडतं. पश्चिमेच्या हातांतला सोनेरी किरणांचा पंखा अर्धा मिटायच्या आंतच भिजतो. पिंपळ सळसळत ओरडतो 'पाऊस! पाऊस!' बघतां बघतां आकाशाचें रूप किती बदलतें! आषाढातलें तारुण्य पुन्हा मिळाल्यासारखें मातीला वाटतें. ऐनमाघांत अशी अकस्मात् कशी रिमझिम होऊं लागली याचें त्यांना आश्चर्य वाटतें....अन् मग सूर्य मावळतो. मातीचा उन्मत्त सुगंध उसासत अंधारांत मिसळतो. आकाश थोडेंसें निवळतें. शुक्राचा तेजस्वी तारा बटमोगऱ्यासारखा उमललेला दिसूं लागतो. बाकी सारें जग धूसर असतें. धूसर....सुगंधी स्वप्नमय....बस्स् एवढेंच. याहून अधिक कांहीहि या निबंधांत सांगण्याचा त्यांनी 'खटाटोप' केलेला नाही. अन् तेंच तर त्याचें वैशिष्ट्य आहे. 'तीन माकडां'सारखी उठल्यासुटल्या संदेशांची खिरापत वांटत सुटलेलीं 'पात्रें' प्रस्तुत निबंधांत येत नाहीत; अन् म्हणूनच एक वेगळेंच व्यक्तित्व त्यांच्या लघुनिबंधाला प्राप्त

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

झाल्याची जाणीव हा निबंध वाचतांना होते. एक छोटेसें निसर्गचित्र. पण मनावर जादूची फुंकर टाकून जातें. आजवरच्या लघुनिबंधांनी जो परिणाम साधला त्यापेक्षा कांही वेगळा ठसा तें मनावर उमटवितें. 'धूसर 'च्या पूर्वी 'दुपार' सारखा लघुनिबंध त्यांनी लिहिलेला दिसतो. याच प्रकारच्या निबंधापासून कवि पाडगांवकरांची लघुनिबंधांच्या क्षेत्रांतील वाटचाल सुरू होते. आधीचें आपलें नुसतें होमवर्क! निसर्गाच्या सहवासासाठी क्षणोक्षणीं आसुसणारें अन् शहरांत येऊन माणसानें माणसाची करून घेतलेली अधोगति पाहून दु:खित होणारें व्यक्तित्व त्यांच्या या प्रारंभीच्या निबंधांतून व्यक्त होत असलें तरी पाडगांवकरांच्या निबंधांचें वैशिष्टय त्यांत आढळत नाही—ज्या अर्थानें तें 'धूसर' आणि 'दुपार' मध्यें आढळतें. या प्रारंभीच्या निबंधांतून पाडगांवकर कांही नवें सांगत होते अशांतलाहि भाग नाही. खरें म्हणजे 'कांहीतरी सांगणें' हें लघुनिबंधाचें कार्य नव्हेच मुळी. या सत्याची जाणीव त्यांना 'धूसर' लिहितांना आलेली दिसते अन् म्हणूनच त्यांच्या लघुनिबंधाच्या विकासाच्या दृष्टीनें प्रस्तुत निबं· महत्त्वाचा ठरतो.

'सोनेरी केसांची परी', 'बाहुल्यांच्या जगांत' यांसारख्या अलीकडच्या निबंधांतून त्यांनी केलेले वेगवेगळे प्रयोगहि अभ्यसनीय आहेत. वनदेवतांच्या प्रदेशांत मनसोक्त फिरणाऱ्या एका निर्व्याज कविमनाचें एक वेगळेंच चित्र त्यांच्या या निबंधांत पाहावयास सापडतें.

'हिरवें कोकण' या अखेरच्या निबंधांतून होणारें त्यांच्या व्यक्तित्वाचें दर्शनहि वेगळेंच आहे. या निबंधाच्या चेहऱ्यावर उमटलेली मिस्कील विनोदाची ती अवखळ रेषा विलोभनीय आहे.

'घरें' हाहि कांही वेगळ्याच स्वरूपाचा निबंध आहे. या निबंधांत नेहमीचे पाडगांवकर दिसतातहि अन् दिसतहि नाहीत. या निबंधांत घरांना त्यांनी मन दिलें आहे, हृदय दिलें आहे. पहाट होते तेव्हा ती झोपलेलीं असतात. खिडक्यांच्या पापण्या मिटलेल्या असतात. हातांत हात घालून साखळी केल्यासारखीं तीं शेजारीं शेजारीं उभीं असतात. सकाळ होते. तीं जागीं होतात. खिडक्यांच्या पापण्या उघडतात. ताजींतवानीं होतात. मग त्यांची एकच धांदल उडते. त्या धांदलीमुळे तीं दमतात. दुपारीं तीं विचारीं भरउन्हांत उभीं असतात. हळूहळू संध्याकाळ होते. त्यांची सारी जाणीव काळोखांत गोठून जाते. एका वेगळ्याच तंद्रींत तीं बुडून जाऊं लागतात...."रस्त्यावर शुकशुकाट होता. रात्रीं पहारा देणारा गुरखा काठी वाजवीत हिंडत होता. त्याच्या बुटांचा टक्-टक् आवाज सुतार पक्ष्यासारखा काळोखाच्या वृक्षावर चोच आपटीत होता. घरें स्तब्ध उभीं होतीं. झोपेंत तीं पार बुडून गेलीं होतीं. त्यांना कांही ऐकूं येत नव्हतें, कांहीच कळत नव्हतें...." हें सारें वाचल्यानंतर मराठी लघुनिबंधाला एक वेगळेंच नवें परिमाण (Dimension) प्राप्त होत आहे, याची जाणीव झाल्याशिवाय कशी राहील? पाडगांवकरांच्या लघुनिबंधांना त्यांच्या कवितेइतकेंच उज्ज्वल भवितव्य आहे. त्याचीं प्रसादचिन्हें त्यांच्या या पहिल्याच संग्रहांत पावलोपावलीं आढळत आहेत. यंदाच्या दिवाळींत त्यांनी लिहिलेले लघुनिबंधहि त्यांच्याविषयींच्या अपेक्षा वाढीस लावणारे असेच आहेत.

देव करो आणि लघुनिबंधाच्या वठूं पाहणाऱ्या वृक्षाला नवीं पानें येवोत! हें 'चेटूक' करून दाखविण्याचें सामर्थ्य पाडगांवकरांच्या लेखणींत खासच आहे.

शेवटीं एक उल्लेख कटाक्षानें करावयाचा आहे; अन् तो म्हणजे चित्रकार प्र. श्री. गोरे यांनी या संग्रहासाठी काढलेल्या मुखपृष्ठाचा. पाडगांवकरांच्या निबंधांवरील सर्वोत्कृष्ट अभिप्राय या चित्रानें दिला आहे! ● ● ●

सदानंद रेगे.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

## ' पश्चिमेचा वारा '

आपल्या पहिल्यावहिल्या कादंबरीची सुरुवातच ज्या कालनिदर्शक वाक्याने लेखकाने केलेली आहे, त्याच ' ग्रह फार उच्चीचे ' असलेल्या कालखंडांतच प्रा. माटे जन्मले आणि वाढले. १९ व्या शतकाच्या मध्यापासून महाराष्ट्रावरच काय, पण साऱ्या भारतावरच पश्चिमेचे ' अपूर्व ' वारे वेगाने वाहूं लागले होते. या कालखंडांत जन्म घेऊन विसाव्या शतकाच्या मध्यान्हीनंतरहि सतत लेखन करणारी जी मंडळी आपल्याला भेटतात त्यांत प्रा. बापूसाहेबांचें नांव आवर्जून घ्यावें लागेल. रियासतकार सरदेसाई, आबा चांदोरकर, मामा वरेरकर आदि लेखक आजहि तरुणाला लाजविणाऱ्या उत्साहाने लिहीत आहेत. या उत्साहाबरोबरच प्रा. माटे यांच्याजवळ वसत असलेला प्रबल आत्मविश्वासच त्यांना कादंबरीच्या क्षेत्रांत पदार्पण करण्यास कारणीभूत झाला आहे हें उघड आहे. अपरिहार्यतेने माटे ललितलेखन करूं लागले नाहीत. आपल्या ललितलेखनाचें स्वतःच प्रकाशन करण्याची त्यांची तयारी ही त्या जबर आत्मविश्वासाची दुसरी बाजू. एरवी प्रकाशनाच्या अंगलट येणाऱ्या उचापतीला ललितलेखक हात घालील काय ?

या त्यांच्या लेखनाला ' उपेक्षितांच्या अंतरंगा'पासून कल्पनातीत यश मिळालें. नवकथाकारांनी तर त्यांना आपल्या बाजूस जवळजवळ ओढूनच घेतलें. पण माटे यांनी स्वतःची आजपर्यंत ' भलतीच ' गफलत कधीच करून घेतली नाही. उपेक्षितांचें अंतरंग आणि प्रस्तुतची कादंबरी यांचीं प्रास्ताविकें ताडून पाहिलीं तर लेखनाबद्दलची त्यांची असलेली एकच भूमिका दिसेल. कथेच्या प्रांगणांत पाऊल टाकतांना जी भीति वाटत होती ती इथेहि आहे. पूर्वसूरींचें ऋण तिथल्याप्रमाणे इथेंहि व्यक्त झालेलें आहे. फरक एवढाच की ' ती भीति हळूहळू नाहीशी झाली. ' हीहि नाहीशी होण्याच्या ' योगाची ' ते वाट पाहताहेत. पण ते ' योगा'साठी थांबलेले नाहीत. 'यापुढची अलिबची कथा पुन्हा केव्हा तरी सांगायला हवी' या पृ. २५६ वरील वाक्याने, त्यांच्या मनांत नव्या कादंबरीच्या वेणा केव्हाच सुरू झालेल्या आहेत हें स्पष्ट होतें.

' पश्चिमेचा वारा ' ही कादंबरी वाचल्यानंतर अनेक प्रश्नोपप्रश्न मनांत निर्माण होतात. ही कादंबरी आहे काय ? ही दीर्घकथा तरी आहे काय ? या लेखनाच्या वाचनाने कोणता परिणाम होतो ? आणि जर या सर्व प्रश्नांचीं उत्तरें नकारात्मक येत असतील तर हें असें कां घडलें ? कथा लिहीत असतांना देखील माटे यांना तंत्राच्या स्वरूपाची कल्पना नव्हतीच. मग तंत्राच्या अभावामुळे प्रस्तुतचें लेखन अयशस्वी झालें काय ? तेंहि एक कारण सांगतां येईल. पण तें मूलकारण नाही. मग भाषाशैली असमर्थ ठरली काय ? मुळीच नाही. या लेखनाच्या संपूर्ण अपयशाचें मूलभूत कारण आहे तें दुहेरी स्वरूपाचें. लेखनांत व्यक्त झालेला आशय आणि त्या आशयाची स्वतःच्या दृष्टिकोनांतून केलेली मांडणी.

कथा-वाङ्मयांत माटे प्रभावी ठरले ते तंत्रकौशल्यामुळे नव्हे किंवा केवळ भाषाशैलीमुळेहि नव्हे. तिथे मूळचा कसदार, प्रेरक आणि लोभनीय आशय, त्या आशयांतूनच निर्माण झालेल्या भाषारूपांत प्रकट झाला. तिथे माटे यांनी कलावंताची अलिप्तता इमानदारीने राखली होती. पण दुर्दैवाने इथे नेमकें याच्या उलट घडलेलें आहे. इथे मूळचा आशयच

[पश्चिमेचा वारा– ले. व प्रका. श्री. म. माटे, नातूबाग, पुणें २, किं. ४॥ रु.]



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अधु आहे. प्रत्यक्ष लेखकच निरनिराळीं नांवें घेऊन आपलीं प्रिय मतें बोलत आहे. मग केवळ शैली किती प्रभावशाली होणार ? जपाच्या माळेंतल्या मण्यांप्रमाणे या लेखनांतील पात्रें लेखकाच्या बोटाच्या चलन-वलनावर फिरत आहेत. पण हे मणी फिरविण्यामागे मंत्र तरी कोणता आहे ?

कम्युनिझम् हाच तो एक मंत्र आहे. लेखकाला या मंत्राचे वादविवाद ऐकूं आले. हा मंत्र कृतीने जपणारी बुद्धिमान् तरुण मंडळीहि लेखकाने पाहिली. अशाच एका तरुणाचें जीवन रंगविणें आणि आपल्याला कळलेला त्या मंत्राचा अर्थ विशद करणें अशा दुहेरी हेतु मनांत बाळगून हें प्रस्तुतचें लेखन झालेलें आहे. येथपावेतो ठीक आहे. पण प्रत्यक्ष व्यक्ति निर्माण करतांना लेखकाने आधार कशाचा घेतला ? तर अशा प्रत्यक्षांतील व्यक्तीबाबतच्या आपल्या ढोबळ अवलोकनाचा. हें अवलोकन वास्तवाहून अगदी भिन्न किंवा वरवरचें झाल्यामुळे लेखनांत फक्त आभासमयता आली आणि मूलभूत वैचारिक संघर्ष उपेक्षित राहिला. किंबहुना लेखक संघर्षच टाळीत आहे असें वाटूं लागतें. हें तरी कां घडलें याचें उत्तर केवळ ढोबळ अवलोकनांत दिसणार नाही, तर त्याला लेखकाच्या अंगभूत वैचारिक आणि सांस्कृतिक मर्यादांत डोकावून पाहावें लागेल.

हें एकदा स्पष्ट झालें की, हें लेखन सर्व वाङ्मयीन मूल्यांना कां पारखें झालें आहे याबद्दलचा विस्मय कमी होऊं लागतो. 'पश्चिमेचा वारा' कितीहि वादळी असला तरी तो अगदी काळजीपूर्वक गाळूनच घेतल्यामुळे त्याचा खरा स्पर्श कोणत्याच पात्राला होत नाही. सर्व मंडळी ' सुरक्षित ' वातावरणांत आपले सर्व व्यवहार करतात. इथे प्रत्येक व्यक्तीला अपरंपार समजूतदारपणा आहे; आणि त्यामुळेच सर्व परिवर्तनें विनासायास होतात. अशा परिस्थितींत व्यक्तीच्या स्वभावाची खरी ओळख कशी होणार ? म्हणूनच या लेखनांतील नायक 'पश्चिमेचा वाराच ' आहे असें लेखक म्हणत आहे; आणि असा नायक वाचकाला कसा दिसणार ? त्या वाऱ्याची झुळूक ज्या व्यक्तींच्या अंगावरून गेल्याचा आभास निर्माण करण्यांत आलेला आहे, त्यावरून या वाऱ्याबद्दल कांही निदान करायचें म्हटलें तर हा वाराहि फारच समजूतदार, शीतल आणि निरुपद्रवी आहे असें वाटतें. जीवनांत वारा येईल तशी पाठ फिरवावी लागते असें आपण ऐकतों; पण इथे मात्र वास्तवाकडेच पाठ फिरवून सर्व व्यक्ति वागत असल्यामुळे त्यांना या वाऱ्याकडेहि पाठ फिरविण्याची पाळी आलेली नाही.

या लेखनांत आशय आणि त्या आशयाची झालेली अभिव्यक्ति यांतून एक अकल्पित योगायोग घडल्याचें निदर्शनास येतें. मराठींतील सुप्रसिद्ध कादंबरीकारांनी ज्या ' आभास-निष्ठ व्यक्तिवादाचा ' पाठपुरावा केलेला आहे तो या लेखनांत आशयाच्या रूपाने दिसतो; आणि अभिव्यक्ति झालेली आहे ती हरिभाऊ आपटे यांच्या वळणासारखी. या लेखनाचें पहिलें प्रकरणच निर्देशित केलें तरी हें सहज लक्षांत येईल. स्वभावलेखनाची पद्धतीहि तीच. वातावरणनिर्मितीसाठीही त्याच आशयबाह्य साधनांची उपरी वाटणारी योजना. जुन्या मराठी कादंबरींत अनावश्यक पात्रें दिसून येतात. 'पश्चिमेच्या वाऱ्यां'तील पटवर्धन आणि मंडळीहि याच सदरांत घालावी लागतील.

आज मराठी कादंबरी कोकणांत आणि घाटापलीकडल्या देशांत स्वतःच्या भविष्याची शोधाशोध करीत आहे. तिच्या अंगावरून हा 'पश्चिमेचा वारा' गेला, इतकेंच. ● ● ●

चंद्रकुमार डांगे.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# परिषद्-वार्ता

( चिटणिसांकडून )

**स्मृतिदिनः**—कै. माधव जूलियन स्मृतिदिनानिमित्त २९ नोव्हेंबरला कविवर्य बा. भ. बोरकर यांचें 'बोलींचा अभ्यास' या विषयावर व्याख्यान झालें. श्री. बोरकर यांनी आरंभीं कै. माधव जूलियनांना श्रद्धांजलि वाहिली व नंतर नियोजित विषयावर व्याख्यान दिलें.

**दीपावलि-वाङ्मय-व्याख्यानेंः**—नियतकालिकांच्या दिवाळी अंकांतील प्रमुख विषयांचें समालोचन करणारी व्याख्यानमाला परिषदेतर्फे यंदा प्रथमच गुंफण्यांत आली. या मालेंत दि. १, २ व ३ डिसेंबरला प्रा. ग. प्र. प्रधान, सौ. पद्मा गोळे व प्रा. प्र. रा. भुपटकर यांनी अनुक्रमें कथा, काव्य व कादंबरी या वाङ्मयप्रकारांचें समालोचन केलें. तिन्ही व्याख्यानांना जिज्ञासु श्रोत्यांची गर्दी होती.

**प्रतिनिधित्व**—दिल्ली येथे २३-२४-२५ रोजीं भरलेल्या आशियाई लेखकसंमेलनासाठी परिषदेतर्फे श्री. प्रभाकर पाध्ये यांना प्रतिनिधि म्हणून नियुक्त केलें होतें. सोलापूर येथे २२-२३ डिसेंबर रोजीं झालेल्या ३९ व्या मराठी नाट्यसंमेलनांत प्रा. चंद्रकुमार डांगे यांनी प्रतिनिधित्व केलें. सुप्रसिद्ध राष्ट्रीय कवि कुंजविहारी ( श्री. हरिहर गुरुनाथ सलगरकर ) यांचा षष्ट्यब्दी-समारंभ सोलापूर येथे ८ व ९ डिसेंबरला साजरा झाला. या प्रसंगीं चिटणीस प्रा. वा. दा. गोखले यांनी परिषदेतर्फे कुंजविहारींचा सत्कार केला. परिषदेची सोलापूर शाखासभा व संमेलनें यांना कुंजविहारींचें सतत साहाय्य व मार्गदर्शन असतें. या दृष्टीने त्यांच्या सत्कारांत परिषदेने भाग घ्यावा हें उचितच होतें. भारत-सरकारने नेमलेल्या संस्कृत कमिशनने परिषदेकडे प्रश्नावली पाठविली होती. या प्रश्नावलीचा विचार करून परिषदेचें धोरण कमिशनला कळविण्यांत आलें. या कामांत परिषदेच्या नियामकमंडळाचे सभासद श्री. म. दा. साठे यांचें बरेंच साहाय्य झालें.

---


कविवर्य यशवन्त यांचे

## दोन काव्यसग्रह

### य शो ध न

बरेच दिवस दुर्मिळ असलेल्या मराठी रसिकांच्या अत्यंत आवडत्या अशा या काव्यसंग्रहाची नवी पांचवी आवृत्ती प्रकाशित झाली आहे. भावनोद्रेक, कल्पनाविलास, मराठी मनाचा बाणा व कणखरपणा इत्यादि गुणांनीं समृद्ध असलेल्या या काव्यसंग्रहाची गोडी अवीट अशीच आहे. किंमत साडेतीन रुपये

### वा क ळ

गेल्या दहा वर्षांतील कवि यशवन्त यांच्या काव्यरचनेंतील निवडक कवितांचा हा संग्रह नुकताच प्रसिद्ध झाला आहे. किंमत तीन रुपये

चित्रशाळा प्रकाशन, पुणें २





अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

# साभार स्वीकार

१ केशवसुत-स्मृति-ग्रंथ-संपा. प्रका. प. चिं. दामले, राहुरी (अहमदनगर); ३॥ रु.

२ आलोक-भगवंत देशमुख; ध्रुव प्रकाशन, साधना संघ, गौळीगुडा, हैद्राबाद; (द.) २ रु.

३ रविवार ते रविवार-शरच्चंद्र टोंगो; किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्करवाडी (द. सातारा), १॥ रु.

४ आपलें व्यक्तिमत्व कसें सुधाराल ? श्री. वि. केळकर; किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्करवाडी (द. सातारा); १॥ रु.

५ स्त्रियश्चरित्रम् आणि इतर वर्मकथा सदाशिव आठवले; सुरस ग्रंथमाला, सोलापूर; ३ रु.

५ गौरीहराची गोड कहाणी म्हणजेच भारतीय संस्कृतीचा सुखी दांपत्य जीवनादर्श-ग. अ. दास्ताने; सुचेता दास्ताने, ७०२ बुधवार, पुणें २; ७ रु.

६ अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका-गं. बा. सरदार; मॉडर्न बुक डेपो; पुणें २; ६ रु.

७ उद्यांच्या महाराष्ट्राची वाटचाल-संपादक मा. प. मंगुडकर, अरविंद मंगरूळकर; चिटणीस, इंडियन कमिटी फॉर कल्चरल फ्रीडम पुणें शाखा, पुणें २; १ रु.

८ महाराणी व इतर कथा-दिवाकर कृष्ण, मराठवाडा साहित्य परिषद, इसामिया बाजार, हैद्राबाद (द.); २ रु.

९ मेनकाः-यशवंत कानिटकर; मराठवाडा साहित्य परिषद, इसामिया बाजार, हैद्राबाद (द.); १॥ रु.

१० मुक्त-मयूरांचीं भारतें—ना. गो. नांदापूरकर; मराठवाडा साहित्य परिषद, इसामिया बाजार, हैद्राबाद (द.); १५ रु.

११ जोगिया-ग. दि. माडगूळकर; पं. अ. कुलकर्णी, कुलकर्णी ग्रंथागार, १८६ शनिवार पुणें २; ३॥ रु.

१२ भूकेरी जीवन-(भाग १) लेखक प्रका.-रा. गो. मोरे; उळेगांव (सोलापूर); १॥ रु.

१३ युद्धकालीन कथा—भा. द. खेर, जयश्री प्रकाशन, २ नारायण, पुणें २; १ रु.

१४ लहरी-र. गं. विद्वांस; इनामदार बंधु, ९९१ सदाशिव, पुणें २; २ रु.

१५ पेशवाईतील रत्नें-म. श्री. दीक्षित; इनामदार बंधु, ९९१ सदाशिव, पुणें २; १ रु.

१६ आर्यसंस्कृति-श्री. प. परि. भगवान् श्रीधर स्वामी; दत्तावुवा रामदासी श्रीधरकुटी सज्जनगड (द. सातारा).

१७ भारतीय तत्वज्ञानसार-ले. प्रका.-ल. ग. बापट; १० आणे.

१८ मानवनीतिशास्त्र (भाग १/२) ले. प्रका.-ल. ग. बापट; १२ आणे व २। रु.

१९. **Essence of Indian Philosophy** L. G. Bapat; 12 Annas.

२० भारतीय आदर्श (भाग १):-बा. मा. दाभाडे; प्रो. शिवाजी स्टोअर्स, अमरावती; १ रु.

२१ रंगाचार्य-गो. स. टेंत्रे; पु. रा. लेले C/o राष्ट्रवैभव प्रेस, मुंबई ४; १४ आणे.

२२ काणकर : व्यक्ति आणि वाङ्मय-संपादक-अविनाश केळकर; सुरेश राऊत; शिरीष एजन्सीज् करितां, २५ अवन्तिकाबाई गोखले रस्ता गिरगांव-मुंबई ४; ५ रु.

**कॉंटिनेंटल प्रकाशन, टिळक रस्ता, पुणें २. प्रकाशनें:—**

२३ जगाचा इतिहास (अर्वाचीन काल) व. मं. शिरसीकर; ७॥ रु.

२४ प्रवाहाचीं वळणें:—ना. ल. वैद्य; ५ रु.

२५ महदंबा आद्य मराठी कवयित्रीः— संपा.-वा. ना देशपांडे; २ रु.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मेंदू वाचवे तोचावे
महाराष्ट्र साहित्य परिषद

२६ माणदेशी माणसें-( दु. आ. ) व्यंकटेश माडगूळकर; ३ रु.
२७ प्रवाहिनी-भ. श्री. पंडित; ३ रु.
२८ मानवी इतिहासांतील महान क्षण-श. शं. देसाई; १॥ रु.
२९ लोकमान्य टिळक-ना. धो. फडके; २ रु.
३० अरुंधती-ग. त्र्यं. माडखोलकर; ३॥ रु.
३१ डॉ. केतकर व्यक्ति आणि विचार-संपा.- श्री. के. क्षीरसागर; ३ रु.
३२ नट, नाटक आणि नाटककार-वसंत शांताराम देसाई; ५ रु.
३३ आर्यागीता-वा. शं. आठवले; ३ रु.

**नागपूर विद्यापीठ प्रकाशनें:—**

३४ श्रीज्ञानदेवांचें जीवनविषयक तत्त्वज्ञान-शं. वा. दांडेकर; ४ रु.
३५ आधुनिक मानसशास्त्र—दे. द. वाडेकर; ३ रु.
३६ हिंदुस्थानांतील धार्मिक इतिहासाचें सामान्य निरीक्षण-शं. दा. पेंडसे; १ रु.
३७ हिंदुधर्माची समीक्षा—लक्ष्मणशास्त्री जोशी;
३८ जैनधर्म आणि वाङ्मय-प. ल. वैद्य; १॥ रु.
३९ आहार आणि शरीरपोषण-वि. ना. पटवर्धन; १ रु.

**मौज प्रकाशन लि. खटाववाडी, गिरगांव, मुंबई ४. प्रकाशनें:—**

४० माणसाच्या गोष्टी-अंबादास अग्निहोत्री; ३॥ रु.
४१ गांधींचा वापू-( द्वि. आ. )-श्री. ना. पेंडसे; ५ रु.
४२ वाटचाल ( द्वि. आ. )-रा. भि. जोशी; ३ रु.

# नवीन सभासद

### तहह्यात

१ प्रा. अ. रा. कामत, पुणें ४
२ प्रा. दि. के. देशपांडे, अमळनेर (पू. खा.)
३ प्रा. ज. ज. दवे, पुणें १

### साधारण

१ श्री. मो. गो. भावे, कल्याण.
२ श्री. य. द. लिमये, सांगली.
३ श्री. बा. द. आगलावे, पुणें २.
४ श्री. मा. स कुलकर्णी, नाशिक.
५ श्री. व. स. जोशी, सातारा
६ श्री. गो. दे. चौधरी, पाडळसे (पू. खा.)
७ श्री. ग. ह जोग, पुणें २
८ सौ. संजीवनी मराठे, पुणें ४
९ श्री. ना. गो. साळोखे, पन्हाळा (कोल्हापूर)

मराठी भाषेमध्यें इतक्या
विस्तृत तऱ्हेने लिहिलेला
' जगाचा इतिहास '
प्रथमच प्रसिद्ध झाला आहे.

**जगाचा इतिहास**

लेखक—द. श्री. मराठे
पृष्ठें १२५०
डेमी साईज

किंमत तीस रुपये

प्रकाशक :—देशमुख आणि कंपनी
२२, कसबा—पुणें २.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# ' पाश्चिमेचा वारा '

पृष्ठें २५६ ] लेखकः—श्रीपाद महादेव माटे [ मूल्य ४॥ रु.

**म. म. प्रो. पोतदारः**—जागजागीं अनुभवाचे बोल पेरलेले आहेत; देशस्थिती-विषयी हळहळणाऱ्या मनाचे पापुद्रे उलगडून दाखविले आहेत व ठसकेदार सृष्टिवर्णनें केलीं आहेत; हें सारें विलोभनीय झालें आहे. तुमच्या पराक्रमी लेखणीचा विजय वाढत जावो.

**डॉ. महेश्वरपंत करंदीकरः**—पात्ररेखन स्पष्ट व रेखीव वटलें आहे. आपल्या व माझ्या पिढीला ही कादंबरी चटका लावील.

**कादंबरीकार भा. द. खेरः**—बापूसाहेब माटे हे जन्मजात कलातंत्रज्ञ आहेत. पात्रें रंगविण्याची त्यांची शैली इतकी प्रभावी आहे की, ती जणू जिवंत बनून आपल्यासमोर उभीं आहेत असा भास होतो.

**डॉ. पेंडसेः**—या प्रदीर्घ कथेंतील राजकीय व सामाजिक परिवर्तनांचें चित्रण उद्बोधक व मनोज्ञ आहे. मानवी मनाचे झिरझिरीत पदर हलक्या हाताने अलग करून आंतील गूढता प्रकट केली आहे. केळकरांची विचारशीलता व परांजप्यांची काव्यमयता यांचा संगम झाला आहे.

**डॉ. कोलतेः**—आपली कादंबरी नाजूक प्रेमाचे रेशमी भावबंध गुरोपांतून घेऊन आली आहे. कथानकविकासांत तुटकपणा जाणवत असला, तरी भाषेच्या आपल्या कसदार शैलीमुळे सारखें वाचत जावेसें वाटतें.

**तरुण भारत, नागपूरः**—लेखकाची निवेदनशक्ति रसाळ आहे आणि परिस्थितीच्या सापेक्षतेने भावना उलगडून दाखविण्याचें त्यांचें कसब स्पृहणीय आहे. म्हणून कादंबरीला अनेक ठिकाणीं काव्यात्मता प्राप्त झाली आहे. लेखनप्रकार कोणचाहि असो; मानवी जीवनाविषयी जे विचार अनुभवाने व चिंतनाने लेखकाने बनविले आहेत, त्यांचें आविष्करण त्यांत झाल्याशिवाय राहत नाही.

**प्रो. निरंतरः**—अगदी गुंतागुंतीचा विचार मोजक्या शब्दांत ठसठशीतपणें सांगण्याचा व पटविण्याचा माटे यांच्या शैलीचा आनंद येथे भरपूर लाभतो. तरुणांच्या नव्या प्रणयभावनेचे लहानमोठे धागे लेखकाने फार नाजूकपणाने विणले आहेत.

**डॉ. वाटवेः**—कादंबरीचा आरंभ माटे यांच्या नेहमीच्या भव्य चिन्तनशीलतेने झाला असून तिचा शेवट मोठ्या लोभस भावनाप्रधानतेंत झाला आहे. माटे यांचा दीर्घ जीवनानुभव, सूक्ष्म अवलोकन, मतें व ग्रह प्रसन्न शैलीच्या पेहरावांत सुंदरपणें व्यक्त झाले आहेत. पात्रांच्या विचार-विकारांच्या सूक्ष्म व तरल आंदोलनांची सहज-सुबोध छाननी हा या कादंबरीचा फार मोठा व कोणाच्याहि डोळ्यांत भरण्यासारखा विशेष आहे. यामुळे कादंबरीचें साधेंच कथानक मोठें हृद्य झालें आहे.

पत्ताः—श्री म. माटे. नातूबाग, पुणें २.

---

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-प्रकाशनें


१. मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास ( मानभाव अखेर )
लेखक-कै. बा. अ. भिडे ( प्रती शिल्लक नाहींत )

२. म. सा. परिषद्-इतिहास
ले. म. म. प्रा. द. वा. पोतदार — मूल्य ३ रु.

३. संत वाङ्मयाची सामाजिक फलश्रुति
ले. प्रा. गं. बा. सरदार .... — मूल्य २ रु.

४. वाङ्मयीन समालोचन ( १९४७ ) — मूल्य २ रु.

५. शुद्धलेखननियम .... .... — मूल्य २ आ.

६. वाङ्मयीन वाद ( परिषद्-पुरस्कृत ) — मूल्य ३ रु.

७. प्राचीन पद्यवेंचे ( प्राज्ञ परीक्षेस लावलेलें ) — मूल्य २॥ रु.

८. निबंधविकास ( प्राज्ञ परीक्षेस लावलेलें ) — मूल्य २ रु.

९. साहित्यसुगंध ( प्रवेश परीक्षेस लावलेलें ) — मूल्य २ रु.

क्र. ७, ८ व ९ हीं पुस्तकें सोडून इतर पुस्तकें सभासदांस सवलतीच्या दरानें मिळतील. ( टपालखर्च वेगळा )

मागणीस्थळः—चिटणीस, म. सा. परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.

* * *

**महाराष्ट्र साहित्य परिषद्, पुणें २.**

कार्यालयाच्या वेळा :
सकाळीं – ८ ते १० व दुपारीं – ४ ते ८.
दर मंगळवारीं सुट्टी.


अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक

वा. रा. ढवळे

वर्ष ३० : अंक ११८ जुलै – ऑगस्ट – सप्टेंबर १९५६

या अंकांत

म. म. वि. वा. मिराशी, डॉ. चैतन्य देसाई, डॉ. ग. वा. तगारे, प्रा. ग. त्र्यं. देशपांडे, डॉ. शं. गो. तुळपुळे, प्रा. ग. प्र. प्रधान, त्र्यं. वि. पर्वते, प्रा. रमेश तेंडुलकर, श्री. य. ग. फफे, जगन्नाथ महाजन

शिवाय संपादकीय, परिषद्वार्ता इत्यादि.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद




## आमचीं कांहीं प्रकाशनें

| | | |
|---|---|---|
| ( १ ) उथळ पाणी | — श्रीपाद जोशी | २–८–० |
| ( २ ) कांचनमेघ | — गिरीश | ३–०–० |
| ( ३ ) आराधना | — प्रा. वा. ना. देशपांडे | २–८–० |
| ( ४ ) अनामिका | — प्रा. वा. ना. देशपांडे | २–४–० |
| ( ५ ) महात्मा गांधीजींचे जीवन प्रसंग | — गोंधळेकर–घोरपडे | १–४–० |
| ( ६ ) भारतीय राष्ट्रपुरुष | — प्रा. भी. गो. देशपांडे | २–०–० |
| ( ७ ) धन्य ती बंदिशाळा | — डॉ. प्र. ना. जोशी | २–०–० |

व्हीनस प्रकाशन,
४१०, शनिवार पेठ, पुणें २.

मुद्रकः—म. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, १९८/१७ सदाशिव, पुणें २.
प्रकाशकः—अरविन्द मंगरूळकर, चिटणीस, महाराष्ट्र-साहित्य-परिषद, टिळक-रस्ता पुणें २.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद